






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






# दीपावली

**साहित्य • कला • संगम**

## श्रेयनामावलि—






वर्ष १५ वें
मार्च १९५९

**दीपावली**—मासिक दर महिन्याच्या एक तारखेस प्रसिद्ध होतें.

संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल.** दलाल आर्ट स्टुडियो ४०–४२ केनेडी ब्रिज मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२. या अंकांत प्रसिद्ध झालेली मतें चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं. प्रकाशित चित्रें व लेख यांवरील सर्व हक्क स्वाधीन.



अनुक्रमणिका



भारतीय संस्कृतीचीं प्रतीकें : १ **सरस्वती**

या कुन्देन्दु तुषारहारधवला या शुभ्र वस्त्रान्विता
या वीणावरदण्डमण्डितकरा या श्वेतपद्मासना ।
या ब्रह्माच्युतशंकरप्रभृतिभिर्देवैः सदा वन्दिता
सा मां पातु सरस्वती भगवती निःशेष जाड्यापहा ॥

हे कुंदेंदुतुषार हार धवले ! हे शुभ्र वस्त्रान्विते !
हे वीणावरदंडमंडित करे ! हे श्वेतपद्मासिते !
हे ब्रह्माच्युत शंकरादिक सुरां वंद्ये परं देवते !
माते पाव सरस्वती भगवती वारीं मनोमंदते.

—बा. भ. बोरकर.









सांप्रत महाराष्ट्रास जरा कठिण दिवस आले आहेत. गेल्या दोन वर्षांत तर महाराष्ट्र आणि मराठा यांच्या अवहेलनेला तर ऊतच आला. आम्ही जरा भूतकाळांत नजर टाकली तर अनेक परकीयांनीं आणि स्वकीयांनीं महाराष्ट्राचीं स्तुतिस्तोत्रें गायिलीं आहेत असें आढळलें. इ. स. च्या शतकांत चीनचा नामवंत धर्मप्रसारक ह्यूएनत्संग हा महाराष्ट्रांत येऊन गेला. त्यानें जें महाराष्ट्र वर्णन केलें आहे त्यांतील एक उतारा आम्ही मुद्दाम मराठी वाचकांसमोर ठेवत आहोंत. हा उतारा १८८७ सालीं प्रसिद्ध झालेल्या 'दख्खनचा प्राचीन इतिहास' या ग्रंथावरून घेतला आहे.

# ‘...एनत्संग आणि मोहोलक्ख’

...केशी राजाच्या कारकीर्दीत ह्यूएनत्संग नांवाचा चीन देशांतील ...बौद्धधर्मी यात्रिक (यात्रेकरू) हिंदुस्थानांत आला होता. ...करीत फिरतां फिरतां तो महाराष्ट्रांत आला. महाराष्ट्राला तो ...या ग्रंथांत) मोहोलाक्ख असें म्हणतो. तो पुलकेशीस भेटला, ...ीं तो वर्णन करतो तें येणेंप्रमाणें. तो 'त्सतलि' (क्षत्रिय) ...ीं आहे. त्याचें नांव 'पुलोकिशे' त्याचे विचार प्रगल्भ आणि ...आहेत; आणि त्याचा परसुखदुःखाविषयीं कन्हवाळा, व परोपकार ...याप्तिप्रदेश फार विस्तीर्ण आहे. त्याची प्रजा पूर्ण स्वार्पणपुरःसर त्याची सेवा करते.' ताम्रपटलेखांच्या प्रमाणांवरून आम्हीं मागें ...आहे कीं पुलकेशीनें हर्षवर्धनाशीं विरोध करून त्याचें बल ...संक्रम कुंठित करून टाकला होता. त्याच गोष्टीविषयीं ह्यूएनत्संग ...णें वर्णन करतो. 'सांप्रत तो महाराज शीलादित्य (हर्षवर्धन) विजयी सैन्य घेऊन पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत स्वाऱ्या करीत आहे. तो ...या राष्ट्रांतील लोकांस जिंकून त्यांवर आपला अंमल बसवीत आहे, ...आपल्या शेजारच्या राष्ट्रांतील लोकांच्या मनांत आपणांविषयीं दहशत ...सें करीत आहे; परंतु त्या राज्यांतील महाराष्ट्रांतील लोक त्याला शरण ...ींत. त्या लोकांस पुरें शासन करावें म्हणून त्यानें वारंवार स्वकीय ...या पांचहि भागांतील सर्व सैन्य एकत्र जमविलें, सर्व राज्यांतील ... सेनानायकांस पाचारण करून आणविलें, आणि असलें सैन्य ... घेऊन स्वयें त्यांच्यावर स्वाऱ्या केल्या, तथापि त्याला ...ून त्यांनीं पुनः कधींहि वैरभावानें मानसुद्धां वर उचलूं नये असें ...ाच्या हातून अद्यापि झालें नाहीं. ह्या गोष्टीवरून, ह्या लोकांस ...रीचा अभ्यास व संवई किती आहे ह्याविषयीं आपणांस सहज ... करतां येईल.'

...चीन देशाहून आलेला प्रवासी महाराष्ट्रदेशीं सुमारें खि. स. ६३९ ...ीं, म्हणजे मागें सांगितलेला ताम्रपट कोरला असेल त्या काळाच्या ...च वर्षांनी आला होता. त्याच्या ग्रंथांत महाराष्ट्राचें वर्णन केलेलें ...ं येणेंप्रमाणें 'त्या राज्याचा परिधि ६००० 'लि' (१२००० मैल) ...आणि एकट्या राजधानीचा परिधि ३० 'लि' होता, त्या राजधानीचें ...अंग एका मोठ्या नदीच्या कांठीं होतें. त्या मुलुखांतील जमीन उत्कृष्ट ...र आहे, व तीपासून धान्य विपुल उत्पन्न होतें. हवा उष्ण आहे. रीतरिवाज साधेपणाचा व प्रामाणिकपणाचा आहे. तद्देशीय लोक बांध्यानें उंच, व स्वभावानें मगरूर व तोरेदार आहेत. जो कोणी त्यांच्या कांहीं-तरी उपयोगी किंवा कामीं पडतो, त्यानें त्यांच्या कृतज्ञतेविषयीं खुशाल भरंवसा ठेवावा; परंतु ज्या कोणाकडून त्यांस राग येण्याजोगें कांहींतरी घडतें, त्यांचा सूड उगविल्यावांचून ते कधींही राहणार नाहींत. कोणी त्यांचा उपमर्द केला तर, तो अपमानाचा डाग घालविण्यासाठीं ते आपला प्राणही धोक्यांत घालतील. संकटांत पडलेल्या कोणीही माणसानें त्यांस हांक मारली तर त्याला मदत करण्यास ते एकदम धांव घेतील; त्यासमयीं आपलें काय होईल, हा विचारसुद्धां ते विसरतात. एकाद्या अपकाराबद्दल सूड घ्यावयाचा असला तर ते आपल्या शत्रूला सावध रहा अशी पूर्वीं सूचना करण्यास कधींही चुकत नाहींत. सूचना करून नंतर प्रत्येकजण चिलखत चढवितो आणि भाला हातीं घेतो. लढाईंत शत्रू पळ काढतील तर त्यांच्या ते पाठीस लागतात. तथापि जे शरण येतील त्यांस ठार मारीत नाहींत. एखाद्या सेनानायकानें युद्धांत डाव गमावला, तर त्याला शरीरदंड न करतां, ते त्याला बायकांचीं वस्त्रें नेसावयास लावतात. त्यायोगें त्याला आपणच होऊन जीव देणें प्राप्त येतें. सरकारच्या पदरीं ज्यांस जीवाची भीति म्हणून कसली ती असतच नाहीं, अशा वीरांचा कित्येकशेंचा समुदाय बाळगलेला असतो. हे लोक युद्धा-करितां सज्ज होतात तेव्हां, प्रत्येक प्रसंगीं निशा यावी म्हणून मद्य पितात. मग अंमलानें धुंद झालेल्या त्या लोकांपैकीं एकेकजण भाला हातीं असला म्हणजे शत्रूकडील दहा हजार लोकांना तृणतुल्य मानून लढाईला या म्हणून त्यांपुढें उभा टाकतो. त्या लोकांनीं मार्गांत भेटलेल्या कोणा माणसास ठार मारलें, तर त्या गुन्ह्याबद्दल कायद्यांत शासन सांगितलेलें नाहीं. फौज कोणत्याहि मोहिमेवर निघाली, म्हणजे हे इमाम दांडगे नौबतीच्या दुमदुमाटाच्या तालावर बिनींत झुकत झुकत तोऱ्यानें चालतात. ह्याशिवाय स्वभावानें क्रूर अशा शेंकडों हत्तींस ते अंमल चारून मस्त करतात. शत्रूशीं गांठ पडून हातघाईस येण्याची वेळ आली म्हणजे ते लोकंही फार मादक मद्य पितात. नंतर माणसें व हत्ती मिळून एक फळी करून ते शत्रूवर धांव घेतात, तेव्हां पुढें जें काय येईल त्याचा पायांखालीं तुडवून चुराडा करून, चालले जातात. त्यांच्यापुढें कोणा शत्रूच्यानें टिकाव धरवत नाहीं. येथील राजाला, हे असले शूर लोक व हत्ती आपल्या पदरीं आहेत म्हणून मोठा गर्व आहे, व तो त्यांच्या बळावर शेजारचीं राज्यें कस्पटांसारखीं मानून त्यांची हेलना करतो.''

अनुक्रमणिका








# गोदावरी

स. आ. जोगळेकर

हे श्रेष्ठ माते, हे श्रेष्ठ नदी, हे श्रेष्ठ देवि, आम्ही अप्रशंसनीय झालों आहोंत, तूं आम्हांला प्रशंसनीय कर.

ऋग्वेद : २-४१-१६

* * *

हे गोदावरी, तूं महाराष्ट्राची माता आहेस. तुझीं सारीं लेकरें तुला सारखीं. संचित किल्मिषामुळें त्यांची फाटाफूट झाली आहे. त्या सर्वांचें तूं एकीकरण व संवर्धन कर.

हे गोदावरी, तूं महाराष्ट्राची अन्नपूर्णा आहेस. तुझी सारीं लेकरें तुला सारखीं. त्यापैकीं कांहीं तृषार्त आहेत व कांहीं क्षुधार्त आहेत. त्या सर्वांचें तूं पोषण कर.

हे गोदावरी, तूं महाराष्ट्राची लक्ष्मी आहेस. तुझीं सारीं लेकरें तुला सारखीं. त्यापैकीं कांहीं अकिंचन आहेत व कांहीं उदासीन आहेत. त्या सर्वांचा तूं उत्कर्ष कर.

हे गोदावरी, तूं महाराष्ट्राची दुर्गा आहेस. तुझीं सारीं लेकरें तुला सारखीं. त्यापैकीं कांहीं पराक्रांत आहेत आणि कांहीं पराङ्मुख आहेत. त्या सर्वांना तूं पराक्रमाकडे प्रवृत्त कर.

हे गोदावरी, तूं महाराष्ट्राची सरस्वती आहेस. तुझीं सारीं लेंकरें तुला सारखीं. त्यांपैकीं कांहीं अज्ञ आहेत आणि कांहीं दुर्विदग्ध आहेत. त्या सर्वांचे अंतर्यामीं तुझें स्फुरण असो.

* * *

सह्याद्रि हा महाराष्ट्राचा पिता आणि गोदावरी ही महाराष्ट्राची माता. हीं नातीं लाक्षणिक आहेत हें विसरतां नये.

सह्याद्रि हा महाराष्ट्राचा, तसाच कर्नाटक व केरल यांचाही पिता आहे. फरक आहे तो एकात्मतेचा.

गोदावरी ही महाराष्ट्राची, तशीच आन्ध्राचीही माता आहे; फरक आहे तो आत्मियतेचा.

सह्याद्री हा महाराष्ट्राचा पिता व गोदावरी ही महाराष्ट्राची माता, हें समीकरण सामान्यतः रुचण्यासारखें असलें तरी तें वस्तुतः जमण्यासारखें नाहीं; कारण गोदावरी व तिला मिळणाऱ्या नद्या या सह्याद्रीच्या कन्या आहेत.

शिवाय महाराष्ट्राला आणखी दोन माता आहेत. तापी व कृष्णा. सह्याद्री व सातपुडा यांचें एकात्म्य आहे, म्हणून त्याही सह्याद्रीच्या कन्या आहेत.

तापी ही जशी महाराष्ट्राची, तशीच गुजरातची एक माता आहे. कृष्णा ही जशी महाराष्ट्राची, तशीच कर्नाटक व आन्ध्र यांची एक माता आहे.

प्रादेशिक अभिनिवेश आहेत ते तिच्या पुत्रांच्या ठायीं. पिता माता समदर्शिन आहेत; सर्वांच्या कल्याणाला उद्युक्त आहेत; किंबहुना जे नंतरचे त्यांना अधिक उपकारक आहेत !

महाराष्ट्राला तीन माता आहेत; अर्थात् महाराष्ट्र त्र्यंबक आहे. पैकी गोदावरी ही ज्येष्ठ आहे. गंगेहून ज्येष्ठ, म्हणूनच गोदावरीला वृद्धगंगा हें अभिधान आहे.

गोदावरीची ओढ पूर्वेकडे, आन्ध्राकडे; आणि तिची वृत्ति सात्त्विक आहे. तापीची ओढ पश्चिमेकडे, गुजरातकडे; आणि तिची वृत्ति राजस आहे. कृष्णेची ओढ दक्षिणेकडे, कर्नाटकाकडे; आणि नंतर पूर्वेकडे आन्ध्राकडे; आणि तिची वृत्ति तामस आहे.

म्हणजे नद्यांनाही सगुण व्यक्तिमत्व असतें कीं काय ? होय; पर्वतांप्रमाणें नद्यांनाही व्यक्तिमत्व असतें. हिमालय जसा देवतात्मा,









सह्याद्रि वीरात्मा. मग हे गुण त्या त्या परिसरांतील नैसर्गिक परिस्थितीचे असोत किंवा त्या त्या परिसरांत स्थायिक झालेल्या समाजांचे असोत.

म्हणूनच महाराष्ट्र जेवढा तामस तेवढाच सात्विक आहे; त्या मानानें राजस कमीच आहे. कृष्णाकांठीं धारकरी, भीमाकांटीं वारकरी व गोदाकांठीं सहकारी !

सह्याद्रि व गोदावरी यांचें माहात्म्य केवळ प्रादेशिक किंवा फक्त महाराष्ट्रापुरतें मर्यादित नाहीं. त्यांचें माहात्म्य अखिल भारतीय आहे.

पुराणांत भारतांतील सात कुलपर्वत नमूद केलेले आहेतः

**महेंद्रो मलयः सह्यः शुक्तिमान् हिमपर्वतः ।**
**विन्ध्यश्च पारियात्रश्च सप्तात्र कुलपर्वताः ॥**

हें वचन अनेक पुराणांत आढळतें. त्यांतील सह्याद्रीचें स्थान अढळ असून हिमालयाचें वैकल्पिक आहे.

कारण, अन्य पर्वतांच्या मानानें हिमाचल अर्वाचीन आहे; अर्वाचीन भूगर्भशास्त्रज्ञांनीं सिद्ध केलेल्या या भौगोलिक सत्याची प्राचीनांना जाणीव असावी.

त्याचप्रमाणें पुराणांत भारतांतील प्रातःस्मरणीय नद्यांची नांवें नमूद केलेलीं आहेतः

**गङ्गे च यमुने चैव गोदावरी सरस्वति ।**
**नर्मदा सिंधु कावेरी, जलेस्मिन् सन्निधिं कुरु ॥**

या यादींतील गोदावरीचें स्थान अढळ आहे. यमुनेला स्वयंपूर्ण अस्तित्व नाहीं आणि सरस्वती वेदविख्यात असली तरी लुप्त आहे, म्हणून यांचीं नांवें वैकल्पिक आहेत. अर्थात् भारताच्या राष्ट्रीय ऐक्याच्या घटकांत गोदावरीचें स्थान महत्वाचें आहे.

गोदावरीच्या परिसराचें नैसर्गिक सौंदर्य भारतांत अद्वितीय आहे. या जान्हवीगंगेहून या गौतमीगंगेचें धार्मिक माहात्म्य अधिक आहे. महाराष्ट्रांत आर्यांचें पहिलें पाऊल पडलें तें गोदावरीच्या परिसरांत, आणि महाराष्ट्राची संस्कृति याच परिसरांत उत्क्रांत झालेली आहे. महाराष्ट्रांतील अनेक पिढ्यांनीं आपल्या यशापयशाचीं प्रतिबिंबें गोदावरींत पाहिलेलीं आहेत.

आणि आतां ? आतांच्या लोकशाहीच्या काळांत, अभिनिवेशामुळें आत्मनिष्ठ व आत्मसंतुष्ट झालेल्या महाराष्ट्राला गोदावरीचा सवाल आहे, कीं माझ्या परिसरांतील माझ्या असंख्य, दरिद्री व वन्य लेकरांचें आर्यीकरण व मराठीकरण करणार, कीं विविध वर्गनिष्ठा सांभाळण्यासाठीं त्यांना आणि आपल्या संस्कृतीलाही पारखे होणार ?

गोदावरी हें महाराष्ट्राच्या राजकीय ऐक्याचें, धार्मिक शुचितेचें व भक्तिभावाच्या तल्लीनतेचें प्रतीक आहे; गोदावरी ही महाराष्ट्राच्या कीर्तीची व संस्कृतीची निशाणी आहे; आमच्या संकल्पित सहकार्याचें शुभचिन्ह आहे; आमच्या भाग्याची ललाटरेषा आहे !

* * *

हे गोदावरी, सर्वपापविनाशिनी, आम्ही तुझें स्मरण करतों; आमच्या मनांतील अहंकारजन्य किल्मिषें नष्ट होवोत आणि आमचीं कायिक, वाचिक, मानसिक पापें नष्ट होवोत.

हे गोदावरी, शुभकार्यप्रवर्तिनी, आम्ही तुझें पूजन करतों; आम्हांला ज्ञान प्राप्त होवो आणि सत्कार्याची प्रेरणा होवो.

हे गोदावरी, सर्वाभीष्टप्रदायिनी, आम्ही तुझी प्रार्थना करतो, आम्हांला आत्मिक सामर्थ्य प्राप्त होवो आणि आमचे हातून कल्याणप्रद कार्यें होवोत.

* * *

हे गोदाई, माझे आई, मी तुझी प्रार्थना करतों आणि मागतों कीं मला तुझ्या माहात्म्याची जाणीव होऊं दे; मी ऐलथडीवरून तुझ्या माहात्म्याचें संकीर्तन मांडलें आहे, तें पैलथडीला पोंचव. आणि आशीर्वाद मागतों कीं मजवर तुझ्या कृपेची पांखर असूं दे.

● ● ●



*जिवलग सखींचा नवरा प्रथमच भेटीला येणार म्हणून थरथरत्या उत्कंठतेनें ती वेडीपिशी झाली आणि—*



# आणि

अरविंद गोखले

मैत्रिणी अगर शाळेंतल्या मास्तरणी आल्या तर कांदेपोहे करतां येतात, वर्गांतल्या मुली आल्या तर आणून ठेवलेली बिस्कीटं किंवा शेजारच्या बाड्यांतलीं बकुळीचीं फुलं देतां येतात, मावसभाऊ धुमकेतूसारखा अचानक उपटला तर चहाच्या जोडीला कोपऱ्यावरून सिगरेटचं पाकिट मागवतां येतं, पण जिवलग मैत्रिणीचा नवरा प्रथमच भेटीला येणार असला तर यापैकीं अगर यावेगळं काय करायचं ? सुधाचे यजमान भेटायला येणार म्हणून काशीची एकच धांदल उडून गेली होती. शनिवारची सकाळची शाळा संपवून ती घरीं आली तेव्हां 'बाळासाहेब कॉन्फरन्सला सोलापूरास गेले आहेत, शनिवारी दुपारी तीनचे सुमारास तुझ्याकडे जायला त्यांना मी बजावलं आहे—' अशा अर्थाचं सुधाचं कार्ड तिला मिळालं अन् थरथरत्या उत्कंठेनं ती वेडीपिशी झाली. पत्र हातात धरून तिनें आरशांत स्वतःकडे व खोलीभर पाहिलं. आपल्या अवताराची, आपल्या छोट्या बिऱ्हाडाची तिला लाज वाटली. अकरा वाजले होते व बाळासाहेब यायला जेमतेम चार तास होते. हातांतला पेपरांचा गठ्ठा तसाच टाकून तिनें पदर बांधला, केरसुणी उचलली व अगदीं आढं झाडण्यापासून साफसुफीला सुरुवात केली.

सुधा तिची अगदीं जिवाभावाची मैत्रिण होती. शाळेंत असल्यापासून दोघींची ओळख होती; पण खरी मैत्री वाढीला लागली ती एस. टी. सी. च्या वर्गांत व विशेषतः सोलापूरला नोकरी लागल्यावर दोघींनीं मिळून बिऱ्हाड केले तेव्हां. तीन एक वर्षं दोघी एका शाळेंत शिकवायला जात होत्या नि एका खोलींत राहत होत्या. एकमेकींसाठीं स्वैपाक करायचा, पेपर्स तपासायचे, झोप आली नाहीं तर जाग्रणं करायची, मनांतलं खुपणारं सुखवणारं सारं एकमेकींना सांगायचं...अशा जिवलग सखीच्या पति-राजाचं स्वागत करणं आपलं परम कर्तव्य आहे ह्या भावनेनं काशी झटत होती. सगळी खोली तिनें नीट लावून टाकली. वह्यापेपरांचे गठ्ठे व कपड्यांचे बोळे पलंगाखालीं दडवले. शेल्फवरची पुस्तकं झटकलीं. भिंती-वरच्या तस्बीरी पुसल्या. कृष्णगोपींचं उत्तान कॅलेंडर काढून टाकलं. सुधाचे नि तिचें चारपांच फोटो एका फ्रेममध्यें बसवले होते, ती फ्रेम पलंगासमोर टांगली. पलंगावर परीटघडीची 'सुखस्वप्नें' विणलेली चादर पसरली. पोह्याचं सामान व बिस्कीटाचा पुडा आणून टाकला. शेजारून चहाचा नवा सेटही आणून ठेवला. सिगरेट ? बाळासाहेब सिगरेट ओढतात कीं नाहीं तें तिला ठाऊक नव्हतं. लग्नांत पुरुषमंडळी सारखी पानतंबाखू खात होती व सिगरेटी ओढीत होती. पण बाळासाहे-







अनुक्रमणिका

फुलदाणीत फुलं रचली. बकुळीच्या फुलांचा ढीगही टीपॉयवर आणून ठेवला. घड्याळाच्या घायकुती काट्यांकडे पहात काशी एकेक उरकीत होती. खोलीला अधिकाधिक उजळा देत होती. सुधाच्या लग्नाला सहा महिनें होऊन गेले होते. सहा महिनें काशीनें एकाकीपणीं, बिन्हाडांत एकटीनें काढले होते. एकटंच शाळेला जायचं, एकटीचाच स्वैपाक करून एकट्यानं जेवायचं, खोलीत एकटंच रहायचं. सुधाला नि बाळा-साहेबांना सोलापूरला येऊन जायला तिनें खास आमंत्रण दिलं होतं. पण व्या संसाराला रमलेल्या सुधेला पत्र लिहायलाही सवड नव्हती. आज गळा विरह, एकाकीपणा अंशतः कमी होणार होता. सुधा नाही तरी तेचा पती भेटीला येणार होता.

सगळं मनासारखं लागलं असं वाटल्यावर काशीला जेवायची आठवण ाली. एक वाजायला आला होता, पण अजून ती जेवली नव्हती. त्रणावर तिची वासनाच नव्हती. झांकून ठेवलेली पोळी भाजी तिनें घडून पाहिली व परत ठेवून दिली. बाळासाहेबांना पोहे आवडतील कीं ाहीं ह्याचीच काळजी तिला वाटूं लागली. सुधाला कांदेपोहे फार आवड-ात. घाईनें काशी न्हाणीघरांत गेली. सकाळी स्नान झालं होतं तरी न्हां तिनें खांद्याखालून पाणी घ्यायला सुरवात केली.

बाळासाहेब सिगरेट ओढीत नसतील; पूर्वी ओढीत असले तरी आतां ांनी सोडली असणार. अन् कांदेपोह्यांची बशी पुढें येतांच बायकोच्या ाठवणीनं ते खुलतील—गार पाण्याचा स्पर्श अंगाला येतांच काशीच्या नांत विचार आले. कांद्यापोह्याची बशी हातांत धरून नवऱ्याच्या ढ्यांत उभी असलेली सुधेची मूर्ति तिला दिसली व कसलीशी कढत ाट तिच्या गार अवयवांवरून गेली. ' त्यानं सिगरेट ओढलेलं मला ळीच रुचायचं नाहीं, काशी, मुळीच रुचायचं नाहीं...' खिडकींतून कुळीकडे बघत माना वेळावून म्हणणारी सुधा तिला आठवली. ल्यासारखं केल्याशिवाय ती राहणार नाहीं हे काशीला माहीत होतं. धाचं • तिला सारंच माहीत होतं. काशी स्वतःशीच खुदकन् हसली व ार पाण्याचे तांबेच्या तांबे अंगावर ओतूं लागली.

आरशापुढें ब्लाऊझच्या घड्यांची चळत घेऊन काशी उभी राहिली. टला रंग निवडावा, कळेना तिला. सगळेच ब्लाऊझ सुधाच्या आव-चे होते. तिनंच आपल्या पसंतीची कापडं नि फॅशन्स काशीसाठी वडल्या होत्या. चटणी रंगाचा ब्लाऊझ पाहिल्यावर बाळासाहेबांना ाय वाटेल ? ह्या सहा महिन्यांत सुधाच्या आवडीनिवडी त्यांनी आत्मसात ल्या असतील कीं नाही ? सुधाच्या लकबी, लहरी काशी सांभाळींत से; आतां बाळासाहेब तिच्या कलांनी वागत असतील कां ?

एकाएकीं काशी वेड्यासारखी आरशांत पाहूं लागली. चटणी रंगाचा लाऊझ घातलेली सुधा तिला आरशांत दिसूं लागली. अन् मग कांहींच ल्यायलेली सुधा आरशापुढें उभी असलेली तिला दिसली...! एका वारीं सुधाचं स्नान झाल्यावर काशी न्हाणीघरांत गेली; पण पाणी पले नव्हते म्हणून तशीच बाहेर आली. खोलीचं दार नुसतं लोटून तलं होतं, त्यांतून तिनं आंत पाहिलं तों न्हाऊन आलेली सुधा आरशा-ढें पदर न घेतां उभी असलेली तिला दिसली. आपलं टवटवीत, उन्नत रीर ती आरशांत न्याहाळीत होती. सुधेची अनावृत्त आकृति काशीनं हिली; नि काशीला दाराशी उभी असलेलं सुधेनं पाहिलं. दोघींही जेनं लाल झाल्या...तो लज्जित चेहरा, तें अनावृत्त उरोज काशीला परत आठवले, दिसले, अन् ती आरशांतून आरपार बघायचा यत्न करूं लागली. बाळासाहेबांना बघायचा यत्न करूं लागली. मांडव परतणं झाल्यावर फोटो काढण्याचे वेळीं सुधेच्या अंगाला रेलून उभे असलेले बाळासाहेब तिला आठवले. जिवलग मैत्रिणीचं अनावृत्त रूप बहुधा काशीनं एकटीनंच पाहिलं होतं. तें तिचंच गुपित होतं. अधिकारही होता...आतां बाळासाहेब...

काशी जरा भांबावून—जरा भारावून पलंगाला टेकली. समोर कोच होतं. पूर्वी त्याजागीं सुधाचा पलंग होता. सुधाच्या पलंगावरची चादर नेहमी परीटघडीची असे. आपल्या पलंगावर कुणी बसलेलं तिला आवडत नसे. त्या कोचावर आतां बाळासाहेब येऊन बसतील. काशीनं घाईनें वेषभूषा आटोपली व ती गॅलरीत धावली.

मैत्रिणीच्या नवऱ्याची इतक्या आतुरतेनं वाट पहात उभं राहणं चांगलं कीं वाईट तें काशीला कळेना. ती तशीच उभी राहून रस्त्याचं वळण पाहूं लागली. तिला बाळासाहेबांना पहायचं होतं, त्यांच्याशीं बोलायचं होतं, त्यांच्या डोळ्यांत साठलेली सुधेची सगळीं रूपं तपासायचीं होती. तिच्या जिवलग मैत्रिणीचे ते जन्माचे जोडीदार झाले होते. आतां सुधा काशीला सोडून त्यांच्या खोलीत राहात होती. काशीऐवजी त्यांच्या-सह अंगतपंगत करीत होती. दिवस बुडाला तरी दिव्याच्या आधारानं गप्पा मारीत होती. काय काय सांगितलं असेल तिनं ?—लहानपणीं गाईम्हशींच्या मागं ती एकटीच रानांत गेली होती. इतपासून लग्नाआधीं अपरात्रीं तिला एक वाईट स्वप्न पडे, तिथपर्यंत सारं ?—जे जे ती दिवसा व दुपारीं व कधीं अपरात्रीं काशीजवळ बोलली तें सारं नवऱ्याच्या कानांत कुजबुजत असेल ?

उन्हाची तिरीप लागूं लागली म्हणून काशी घरांत आली. आपल्या खोलीत सुधेनंच संसार थाटला आहे असं तिला भासूं लागलं. आरशापुढें सुधा उभी होती नि तिला लगटून होते बाळासाहेब. फोटोफ्रेममध्यें सुधा नि बाळासाहेब हंसत होते. ते कोचावर बसले होते नि ती कांदेपोह्यांची बशी घेऊन उभी होती—काशी जरा सुखावली—जरा बावरली. तिला भूक लागली. बाळासाहेब यायच्या आंत खाऊन घ्यावें म्हणून ती आतल्या दोन खणी स्वैपाकघरांत गेली. तिच्या डोळ्यापुढें रुखवत दिसूं लागलें, बाळासाहेबांना तिनं आग्रहानं वाढलं होतं—उखाणा सांगायला सुधेच्या पाठी ती उभी होती—बाळासाहेबांचा होकार आला तेव्हां सुधा नि ती उत्तररात्रीपर्यंत बोलत होतीं,—अन् करवलीच्या अविर्भावानं सुधेची सासरीं पाठवणी करतांना ती बाळासाहेबांना माझ्या सुधेला सांभाळा म्हणून म्हणाली होती—थोडीशी पोळी खातांच काशीचं पोट भरलं व डोळे पाणावले. सुधा जड पावलांनी दूर गेलेली तिला दिसली—ती भरल्या मनानं दाराशी आली, तों दारांत बाळासाहेब उभे होते.

" या—" दचकून काशी मागें सरली व स्वतःला सावरीत हंसून म्हणाली. सुधेचा नवरा वेगळा दिसत होता. लग्नांत धोतर नि रेशमी सदरा घातलेले बाळासाहेब आता सुटाबुटांत होते. किती तरतरीत व लहानखोर दिसत होते.

" सुधानं कार्ड टाकलं होतं नं ?—मला बजावलं होतं तुमच्याकडे जायला. अगदी वेळ काढून आलो—" बाळासाहेब खोलीभर पहात व हाशहुश करीत म्हणाले, " या कॉन्फरन्सच्या गडबडीत विसरलोच होतो—" नेहमीचीच संवय असावी तसें ते सरळ कोचावर जाऊन बसले.

पलंगाला टेकून काशी उभी राहिली. तिची छाती उगाचच धडधडत होती. परका पुरुष तिच्या बिन्हाडांत आजवर आला नव्हता. पण बाळासाहेबांना परकं कसं म्हणायचं? ते सुधाचे यजमान होते. त्यांचा ह्या घरावर हक्क होता. ह्या कोचावर, इथल्या पुस्तकावर, आरशातल्या प्रतिबिंबावर, खिडकीतून दिसणाऱ्या बकुळीवर–कितीतरी दिवसांनी घर भरल्यासारखं काशीला वाटलं. तिचा चेहरा उजळला. कौतुकानं ती म्हणाली,

"आमची सुधा ठीक आहे नं?"

"तुमची!" हातांतल्या टाइम्सनें वारा घेत बाळासाहेब हंसले. "छान आहे कीं—तुमची खूप आठवण करते. तुमच्याबद्दल, ह्या खोलीबद्दल खूप बडबडत असते ती—"

काशी पलंगावर बसली. नव्या संसारात सुधा आपल्याला विसरली नाहीं ह्यानें हरकून गेली. उद्यां सुधा भेटली कीं आपल्याला एका बाजूला घेऊन ती नवऱ्याबद्दल सांगत सुटेल ह्यांत तिला शंका नव्हती.

अंमळ कुणीच बोललं नाहीं. बाळासाहेबांजवळ सुधा पोपटासारखी बोलत असेल, पण काशीला त्यांच्याशी काय बोलावं तें चटकन् सुचेना. अन् बाळासाहेब तर त्या कोचांत जुलमानं आणून बसवावं तसें बसले होते.

"रात्रीची गाडी कितीची आहे हो?" बाळासाहेब एकदम म्हणाले.

"जाणार आज?" काशीनं चमकून विचारलं.

"हो. कॉन्फरन्सचं काम संपलं सकाळींच—इथं उन्हाळा कोण होतोय्. अन् गांवही कसलं बकाल—" बाळासाहेब परत वारा घेत कंटाळल्या चेहऱ्यानें म्हणाले, शक्य असेल तर आत्ताच्या गाडीनं जायचीही त्यांची तयारी होती. बायकोन बजावलं होतं म्हणून ते काशीला भेटायला थांबले होते एवढंच! काशीला ते जाणवलं व तिचा विरस झाला. सुधाबद्दल दोघांनी खूप खूप बोलावं असं तिला वाटत होतं. पण ती नुसतंच म्हणाली,

"खायला करते—"

"अहो, नको—आज पार्टी होती आमची. अगदी भूक नाहीं—"

"कांदेपोहे—" काशी हंसून म्हणाली. नि बाळासाहेबही स्वतःला नकळत हसले.

स्वैपाकघरांत जाणाऱ्या काशीच्या पाठमोऱ्या आकृतिकडे पहात बाळासाहेब ऐसपैस बसले. तीन दिवस हॉटेलचं खाऊन ते विटले होते. आता घरचं खाणं नि तेही कांदेपोहे—बाळासाहेबांना सुधाची तीव्रतेनं आठवण आली. सुधा खुशीत असली की कांद्यापोह्यांचा बेत करी; बाळासाहेबांना घास देई. बाळासाहेब खुलले; नि मग त्यांच्या ध्यानांत आलं कीं सुधेला स्वैपाक शिकवला तिच्या मैत्रिणीनं, त्यांना पोह्यांची गोडी लावली सुधेनं नि सुधेला लावली काशीनं!—कोचांतल्या कोचांत ते सावरून बसले. कंटाळल्याची भावना जरा नाहीशी झाली व डोळे बारीक करून ते स्वैपाकघराच्या दिशेनं बघूं लागले.

मधल्या दारातून काशीच्या हालचाली अधूनमधून दिसत होत्या. बाळासाहेबांना वाटलं, काशी अगदी अरबूज आहे. पुरुषी, मग सुधासारखं 'काशी काशी' करीं त्याची केलेली थट्टा व त्यावरचं सुधाचं चिडणं त्यांना स्मरलं. सुधा काशीला फार मानते. दीडदोन वर्षांच्या सहवासानं दोघी जिवलग मैत्रिणी झाल्या होत्या. लग्न होण्यापूर्वी परक्या गावांत,

[पान १२ वर]

## या महिन्यांतील माननीय व्यक्ति :



इंदिरा गांधीं

आपल्या तरुण वयांत पित्यानें जें पद भूषविलें, त्याच पदावर अधिष्ठित होण्याचें भाग्य पं. नेहरूंच्या या भाग्यशाली तरुण कन्येच्या वाट्याला आलें आहे. कायद्याअन्वयें पित्याच्या मिळकतीचा वारसाहक्क कन्येला प्राप्त झाला असला तरी पित्याच्या कर्तृत्वाचा अशा तऱ्हेचा वारसा मिळविण्याचें भाग्य फारच थोड्या मुलींच्या वाट्याला येत असेल.

पुणें, शांतिनिकेतन, ऑक्सफर्ड आणि स्वित्झर्लंड, या ठिकाणीं इंदिरा गांधींचें शिक्षण झालें. परंतु या शिक्षणापेक्षां आपल्या कर्तृत्ववान वडिलांच्या बरोबर असंख्य परदेशयात्रा करण्याचा जो सुयोग त्यांना प्राप्त झाला त्याची महति अधिक. आपल्या पूर्वायुष्यांत राजकारणापेक्षां इंदिरा गांधींनी समाजकारणाकडे लक्ष अधिक दिलें आणि त्यानंतर देशाचा कायापालट करण्याच्या चिंतेंत मग्न असणाऱ्या आपल्या वडिलांची हरएक बाबतींत काळजी वाहणें हा उद्योग त्यांनीं शिरावर घेतला. एका अर्थी चार भिंतीच्या आड राहून त्यांनीं हें थोर राष्ट्रकार्य केलें यांत शंकाच नाहीं.

आज सरोजिनी नायडूसारख्या कर्तृत्ववान स्त्रियांनीं जी गादी चालविली त्या गादीचा वारसा त्यांच्याकडे आला आहे. स्वातंत्र्योत्तर काळांत काँग्रेसच्या अध्यक्ष पदाची जबाबदारी कठिण आणि विचित्र झाली आहे. राज्याराज्यांतील काँग्रेसची जुनी लोकप्रियता ढासळूं लागली आहे. पक्षां-






तील अंतर्गत यादवीला तर ऊत आला आहे. डाव्या गटांनीं खऱ्या अर्थानें एकजूट केली तर काँग्रेसला पूर्वीची लोकप्रियता टिकवून धरणें अवघड जाणार आहे. गांधी-नेहरूंची पुण्याई फार दिवस उपयोगी पडणार नाहीं अशी जनतेची खात्री होत चालली आहे. अशा परिस्थितींत काँग्रेसमध्यें तरुण रक्ताचा प्रवेश होऊं द्या अशी सर्वत्र हांकाटी चालली आहे.

इंदिरा गांधींची ही निवड म्हणजे काँग्रेसमधील पुरोगामी गटाचा विजय असें मानलें जात असलें तरी हा पुरोगामी गट स्वतःच्या जिद्दीवर नवें धोरण कितपत अंमलांत आणील याची शंका आहे. इंदिरा गांधींचें व्यक्तिमत्व प्रसन्न, शालीन आणि गंभीर आहे त्यांत तडफ आहे पण प्रखर आवेश नाहीं. त्यांचें वक्तृत्वहि त्यांच्या व्यक्तिमत्वाला साजेसें सौजन्यशील आहे. त्यांत प्रतिपक्षाची रेवडी उडविण्याचें किंवा सामान्यांच्या भावना चेतविण्याचें सामर्थ्य नाहीं.

यामुळें त्यांचें मर्यादित संघटनाचातुर्य काँग्रेसची आजची गरज भागवूं शकेल कीं नाहीं हा एक प्रश्नच आहे. अर्थात् श्रेष्ठींच्या मार्गदर्शनाखालीं कां होईना पण आज एक भारतीय स्त्री राजकीय क्षेत्रांतील अत्युच्च स्थानावर जाऊन बसली हा भारतीय लोकशाहीच्या पुरोगामित्वाचा विजय आहे.

•••

---

सोबतीविना दोघींनीं एकत्र दिवस काढले होते. त्यावेळच्या किती तरी आठवणी सुधेनं बाळासाहेबांना सांगितल्या होत्या. त्या सगळ्या कहाण्यांत काशी होती. काशीचं अस्तित्व, काशीचं महत्व बाळासाहेबांना अचानक जाणवलं नि त्यांना एकदम विचित्र वाटूं लागलं.

आतां ते खोलीभर भिरभिरत्या नजरेनं पाहूं लागले. शेजारच्या टीपॉयवर बकुळीची फुलं होतीं; नि त्यांच्या घरीं, सुधेच्या उशीखालीं बकुळीची माळ होती. इथलीच ती फुलं. कदाचित् काशीनं माळलेली. दुरून येणारा बकुळींचा गंध हुंगीत सुधेनं कित्येक रात्रीं अकारण जागून काढल्या होत्या. जणूं बाळासाहेब भेटावेत म्हणून. आपल्यासाठीं घेतलेलें ते एक व्रत बाळासाहेबांनां वाटलं होतं. पण आतां त्यांना उमगलं कीं, त्यांची बायको आलोचन जागत होती तेव्हां सोबतीला होती ही मैत्रिण. ह्या समोरच्या पलंगावर काशी अन् कोचाच्या जागीं सुधा. ह्या कोचाच्या जागीं पूर्वी आपल्या पत्नीचा पलंग असला पाहिजे. जी लाघवी सुधा आजकाल सदोदीत आपल्या कुशीत राहायला बघते ती पूर्वी इथें काशीपुढें लोळत असली पाहिजे.

भितीवरच्या आरशांत अस्ताव्यस्त झोपलेली सुधा त्यांना दिसूं लागली अन् मग ते भान विसरून आरशातच बघत राहिले. दिवस-रात्र एकत्र राहिलेल्या ह्या नवोढांनी एकमेकींचे देहही पाहिले असतील! न्हातांना, कपडे बदलतांना, गादीवर लोळतांना. जे फक्त बाळासाहेबांनाच ज्ञात होतं, जिथें फक्त बाळासाहेबांचाच स्पर्श होतो तिथें काशीची नजरही पडली असणार! बाळासाहेबांना काशीबद्दल तीव्र मत्सर वाटला; नि त्याच क्षणीं तिच्याबद्दल अपार आपलेपणा वाटूं लागला.

उन्मादाच्या गुंगींत जेव्हां ते डोळे मिटून हुंकार देत पडून राहत, तेव्हां त्यांच्या केसांतून बोटं फिरवीत सुधा सोलापूरला काढलेल्या दिवसांच्या अनेक आठवणी सांगे. 'कधी नाही तो पाऊस कोसळला... पार्कपासून काशी नि मी वसंतसेनेसारख्या भिजत आलो...' 'रोज अपरात्री मला वाईट स्वप्न पडायचं, मी दचकून उठायची नि काशीला मिठी मारायची...' 'तुमच्या घरचा 'हो'कार बाबांनी मला कळवला तेव्हां मी अगदी गोंधळून गेले. काशीनं तेव्हां मला आधार दिला.—' त्यावेळीं क्षुल्लक वाटलेली सुधेची बडबड आता बाळासाहेबांचं मन भारून टाकूं लागली. त्या शब्दामागची सृष्टि आता सभोंवतीं स्पष्ट दिसूं लागली.

बाळासाहेब कोचावर आणिक रेलून, आरामशीर बसले. जणूं सुधाहीं त्यांना लगटून बसली होती. तो कोच, समोरचा आरसा, शेल्फवरची पुस्तकं, टेबलावरचा दिवा, खिडकीतून दिसणारी बकुळीची फांदी नि स्वैपाकघरांतून येणारा स्टोव्हचा आवाज ह्या सगळ्यांशी आपलं कांहीं नातं आहे असं त्यांना वाटूं लागलं. समोरच्या फोटोफ्रेममधल्या सुधाचा नि तिच्या खांद्यावर हात ठेवून उभ्या असलेल्या काशीचा फोटो पहात ते नकळत शीळ घालूं लागले.

पोह्यांच्या बशा व चहाची किटली-कपबशा घेऊन काशी बाहेर आली. पोहे करायला वेळ लागला म्हणून ती कांहीं म्हणणार होती. पण बाळासाहेब खुशींत बसलेले पाहून तिला आश्चर्य वाटलं व कांहीं बोलायचं ती विसरून गेली. परत जायच्या गाडीची चवकशी करणारे बाळासाहेब टायची गांठ सैल करून, कोचावरची उशी खाकेखाली सरकवून, आरामशीर बसले होते. जणूं ते आपल्या बिऱ्हाडांत मुक्कामच करायला आले होते.

"आवडले पोहे?" पोह्यांचा घास बाळासाहेबांनीं तोंडांत घालतांच काशीनं विचारलं.

"इतके दिवस नुसतं ऐकत होतो सुधाकडून. आज प्रत्यक्षच—" बाळासाहेबांनीं आणिक तीनचार घास घेतले.

"इश्श्य—ती माझ्यापेक्षां सुगरण आहे—"

"तुम्हीच शिकवलंत तिला. पोह्यांपासून पुरणपोळ्यापर्यंत—"

"तुमच्यापर्यंत पोंचलं वाटतं सारं?"

"मग कुणापर्यंत पोचणार–?" बाळासाहेब हंसून उद्गारले नि त्यांनीं सावकाश खाणं संपवलं.

काशी जेवली नव्हती, पण तिला पोह्याचे चार घांसही जाईनात. बघतां येईल तितकं ती बाळासाहेबांकडे बघून घेत होती. त्यांच्या डोळ्यांकडे, हाताकडे, हालचालीकडे. सुधेचा स्पर्श, सुधेचा गंध त्या आकृतिशीं एकजीव झाला होता. जे सगळं काशीचं होतं, काशीनं पाहिलं जपलं होतं तें सारं आतां बाळासाहेब सांभाळीत होते. काशीच्या भोंवती घुटमळलेला जीव आतां बाळासाहेबांचे भोंवतीं घोंगावत होता. बाळासाहेबांचं व काशीचं केवढं जवळचं नातं होतं! एक व्यक्तिमत्व, एक भावविश्व दोघांनींही जवळून न्याहाळलं होतं. सुधा काशीची होती नि सुधा बाळासाहेबांचीही होती. ती दोघांशी समरस झालेली होती. पण काशी व बाळासाहेब एकमेकापासून दूर होते. आणि त्यांनीं समरस होणं अशक्य होतं. मैत्रिणीचा पति एवढंच तिला बाळासाहेबांकडे पहातां येत होतं. त्याच नात्यानं उपचार सांभाळून, दूरत्व ठेवून, वागायचं होतं. काशीला हें सारं विचित्र वाटलं व ती अधिकच वेंधळ्यासारखी बघत राहिली.

"—तो टेबल लँप सहावीच्या मुलींनी भेट दिला ना?—तो फ्रेम








मधला, बुजवीकडचा फोटो पार्कमधला ना ? तुमच्या मावसभावाने काढलेला ?—अन् लुगड्यांचे बोळे अजून पलंगाखालीं टाकतां कां नाहीं ? बाळासाहेब खोलीभर पहात एकेक विचारीत होते. जणूं ते ह्या खोलीत सहा महिन्यापूर्वी राहिले होते. काशीबरोबर ! सुधाशी ते समरस झाले होते अन् आता सुधाच्या स्मृतिशी एकरूप होत होते. सुधेच्या इथल्या वस्तू नि इथले दिवस ह्यांच्याशी त्यांचंही नातं होतं. बकुळीवरुन येणाऱ्या झुळकीशी, आरशातल्या दिसणाऱ्या प्रतिबिंबाशी, ह्या खोलीतल्या विचित्र एकांताशी, इथे राहणाऱ्या सुधेच्या सखीशी—

मग बाळासाहेबही काशीकडे पाहूं लागले. काशी सुपारीचं तबक लावीत होती अन् तिच्या लांबसडक बोटांकडे, घट्ट पदराकडे, भरदार आंबाड्याकडे, मोठ्या कुंकवाकडे, शेलाट्या शरीराकडे बाळासाहेबांची नजर धाव घेत होती. आणि त्यांचं मन म्हणत होतं, काशी तूं आणि मी कसल्याशा धाग्यांनी जखडलेलो आहोत. आपण एकाच नाण्याच्या दोन बाजू आहोत. माझी लाडकी ही तुझी सखी आहे. तुझ्या सहवासांत सुधेचं भावजीवन बहरलं; आणि आता त्याची आकाशपुष्पें माझ्या संसारात सडा घालीत आहेत. एका व्यक्तीशी आपण सुखदुःखाचे वाटेकरी झालेलो आहोत. त्यांना एकदम वाटलं, की काशीशी फार मोकळेपणानं, अगदी मनातलं बोलावं !—पण त्या क्षणींच ते गप्प झाले. काशी एक परस्त्री होती. लग्नात कांहीं तास व आत्ता कांहीं मिनीटं भेटलेली बायकोची ती केवळ एक मैत्रिण होती.

" सुपारी घेता नं ? " काशीनं मृदुपणीं विचारलं.

" लवंग घेतो एक—"

" सुधा पाहुण्यांसाठी सुद्धा सुपारी आणीत नसे. ह्या सुपाऱ्या परवां आणल्या मी—"

" लग्नात पान खाल्लं मी, तें शेवटचंच—" बाळासाहेब म्हणाले व अर्धीच लवंग खाऊन परत गप्प झाले.

कांहीं मिनीटं अशीच गेली. मग बाळासाहेब म्हणाले,

" दुसरी कुणी पार्टनर नाहीं घेतलीत विन्हाडांत ? "

" नाहीं घेतली झालं—" काशी उद्‌गारली व पलंगाच्या कडीशी चाळा करूं लागली. आपल्या मनांत बाळासाहेबांच्याबद्दल जे विचार येत आहेत ते बाळासाहेबांनी हेरलं असं तिला त्यांच्या बोलण्यावरून, त्यांच्या बदललेल्या चर्येवरून, त्यांच्या आवाजावरून वाटलं. तिचा अधिकच गोंधळ उडाला. न राहवून मग तिनें बाळासाहेबांच्याकडे टक लावून पाहिलं.

" तिच्या सरळ दृष्टिक्षेपानं बाळासाहेब जरा गडबडले, माझ्याबद्दलच तुम्ही विचार करीत आहांत ना ?–जे मला वाटतंय, तेच तुम्हाला वाटतंय ना ?–आपण एकमेकांशी एका भावजीवनानं, एका गुपितानं बांधले आहोत असं तुम्हालाही म्हणायचंय ना,' –असंच जणूं काशी म्हणत आहे असं त्यांना वाटलं. जे त्यांच्या अर्धांगीनं केलं ते त्यांनी करणं अगत्याचं होतं असं त्यांना प्रामाणिकपणानं वाटूं लागलं. दोघांच्यांत औपचारिक अंतर ठेवण्यांत काय अर्थ आहे ? धीर करून त्यांनी बोलायचं ठरवलं. पण दुसरेच शब्द त्यांच्या तोंडांत आले,

" तुम्ही आमच्याकडे कधी येतां ? शाळेला सुट्टी लागली कीं आलं पाहिजे...सुधाला फार आनंद होईल..." नवऱ्याला मत्सर वाटेल इतकी विकृत मैत्री दोन स्त्रियांच्यांत असूं शकते असं कुठेसं वाचलेलं त्यांना अकस्मात स्मरलं,

"सुट्टीला अवकाश आहे. त्याआधीं तुम्हीं दोघं मिळून आलं पाहिजे सोला-पूरला—" घसा कोरडा करीत काशी म्हणाली. पहिल्या रात्रीच्या हकीगती पुरुष आपल्या मित्रांना सांगतात असं कुठेतरी ऐकलेलं तिला आठवलं.

झालेलं संभाषण म्हणजे भेटीचं भरतवाक्य ह्या जाणीवेनं बाळासाहेबांनी टायची गाठ घट्ट केली. सगळ्या खोलीवर ओझरती अखेरची दृष्टि टाकली. पलंगाच्या कडेला टेकून बसलेली काशी उठली व चादरीची सुरकुती नीट करूं लागली. बाळासाहेब निरोप घेणार, ह्या खोलीबाहेर जाणार म्हणून ती खिन्न झाली. त्यांनी उठण्याची लगबग केली तसं निरोपाचं म्हणून म्हणाली,

" सांगा बाबीला—"

" बाबीला ? "

थक्क होऊन बाळासाहेब कोचांत खिळून बसले. काशीही गलबलून गेली. आपल्या मैत्रिणीला ती खास ठेवणीतलं म्हणून बाबी अशी हाक मारीत असे. तिने शोधलेलं, तिनेच म्हणायचं ते नाव होतं !—अन् लग्नांत सुधेचं नांव बदलल्यावरुन रुसणी फुगणी झाली तेव्हां एकांतात बाळासाहेबांनी सुधेला सांगितलं होतं कीं तुझं नांव कुणी कांहींही ठेवो. मी आपला तुला बाबी म्हणणार !

विलक्षण संभ्रमानें काशीनें पलंगावरची चादर चुरगाळून टाकली. जातो म्हणणं, कोचावरून उठणं, खोलीबाहेर पडणं बाळासाहेबांना कठीण वाटूं लागलं. दोघंही एकमेकांकडे पहात, एकमेकांच्या नजरा चुकवून बसून राहिले.

वेळ जाऊं लागला नि बाळासाहेबांना आठवलं कीं आपल्या खिशांत सिग-रेटचं पाकीट आहे. लग्न झाल्यापासून त्यांनी सिगरेटला स्पर्श केला नव्हता. कॉन्फरन्सच्या पार्टीत त्यांना सिगरेटचं पाकीट मिळालं होतं. मनांतला विचित्र गोंधळ शमविण्यासाठीं सिगरेट ओढणं हा एकच उपाय होता.

वेळ खूप होता व पाकीटांत दहा सिगारेटस् होत्या. बाळासाहेबांनी सिगरेट शिलगावली व ते धुराचे लोट सोडूं लागले. गलबललेल्या मनानं काशी धुराच्या झोतांत अंधुक दिसणारी बाळासाहेबांची आकृति पाहूं लागली. मग बकुळीचा ढीग पुढे ओढून ती एकेक फूल हळुवारपणें दोऱ्यांत ओवूं लागली. • • •

## कळकाचें पातें

भगव्या आकाशांत डोलतें
पिकलें पिवळें कळकाचें बन
निळें निळें काळींतिल पाणी
बसलें जवळच विळखा घालुन
' शिवालयांतिल घुमली घंटा '
वदलें कांपत शीतळ वारें
मावळलें जळ, मावळलें बन,
क्षणांत अन् पाळटलें सारें
होता पिकला पिवळा जोगी
हिरवा हिरवा छेडित पांवा
मुक्त नीळकच विकचलोचना
स्वताच झाली निळा विसावा
—तोंच अचानक झळलें माझ्या
अंगावर कळकाचें पातें
अजून तें कधि सायकाळीं
त्या जोग्याचें गाणें गातें

—बा. भ. बोरकर












• **बहुरूपी** — वसंत शां. देसाई.
• **झोका** — विजया राजाध्यक्ष.
**यांत्रिकाची यात्रा** — बाळ सामंत.

साहित्य अकादमीचें बक्षिस मिळालेला ग्रन्थ

*बहुरूपी*

( लेखक : चिंतामण गणेश कोल्हटकर )

( प्रकाशक : ह. वि मोटे )

सुप्रसिद्ध नट आणि दिग्दर्शक, श्री. चिंतामणराव कोल्हटकर, यांनीं आपल्या या ग्रंथाला ' बहुरूपी ' हें नांव कां दिलें तें समजत नाहीं. या ४४२ पृष्ठांच्या ग्रंथांतील पहिल्या ७६ पृष्ठांत चिंतामणरावांनी आत्मचरित्राचें निवेदन केलें आहे. पण तें निवेदन १७–८–१९११ पर्यन्तचें—म्हणजे त्यांनीं महाराष्ट्र नाटक मंडळींत प्रवेश करून नाट्यव्यवसायांत पाऊल टाकलें त्या घटके पर्यन्तचेंच आहे. त्यानंतर त्यांनीं ज्या नाटककारांच्या नाटकांत भूमिका केल्या किंवा ज्यांच्या नाटकांचें दिग्दर्शन केलें अशा एकंदर बत्तीस नाटककारांच्या नाटकांचे आणि स्वभावाचे विशेष त्यांनीं कथन केले आहेत. चिंतामणराव नट होते आणि नट हा " बहुरूपी " असतो हें खरें, पण त्यांनीं घेतलेल्या निरनिराळ्या " रूपांची " (भूमिकांची) प्रस्तुतच्या ग्रन्थांत जशी चिकित्सा केलेली नाहीं तशीच आपल्या " बहुरूपी–व्यवसायाची " कथासुद्धां त्यांनीं सांगितलेली नाहीं. त्यांचा आणि ज्या बत्तीस नाटककारांचा सहवास घडला, त्यांच्या संबंधीच चिंतामणरावांनीं या ' नाटककार-बत्तिशींत ' चर्चा केली आहे. स्वतः चिंतामणरावच म्हणतात, " या पुस्तकांत माझें असें काय आहे ?—आहे तें त्यांचेंच—त्यांचीच नाटकें—त्यांच्याच सहवासांतल्या गोष्टी—" या दृष्टीनें ' माझे नाटककार ' हे पूर्वसंकल्पित नांव ग्रंथाला अधिक शोभलें असतें.

चिंतामणराव हे मराठी रंगभूमीवरील एक अग्रेसर नट आणि दिग्दर्शक होते. इतकेंच नव्हे, तर ते सुप्रसिद्ध बलवंत नाटक मंडळीच्या व्यवसायाचे दिग्दर्शक होते. या ग्रंथाचें स्वरूप आत्मचरित्रात्मक आहे आणि अशा ग्रंथांत आत्मस्तुति आणि परनिंदा यांचा प्रवेश होण्याची फार भीति असते. आणि म्हणूनच कीं काय, स्वतःचा व्यवसाय तर राहोच, पण आपल्या जमान्यांतल्या समव्यवसायिकांनासुद्धां स्पर्श करण्याचें चिंतामणरावांनीं कटाक्षानें टाळलें असावें. गणपतराव जोशी, गणपतराव भागवत, गणपतराव बोडस, बालगंधर्व, वामनराव पोतनीस, केशवराव दाते अशा असामान्य नटांच्या अभिनयादि गुणांच्या रससेवनापासून हा ग्रंथ अलिप्त राहिला आहे.

सुरवातीच्या आत्मचरित्रात्मक ' स्वगता' तलें निवेदन प्रसंगपूर्ण, भावनापूर्ण आणि चटकदार आहे. त्यानंतरच्या बत्तीस नाटककारांत खाडिलकर, तात्यासाहेब केळकर, यशवंतराव टिपणीस आणि वरेरकर यांचा समावेश केलेला असला तरी खरे शास्त्री, वामनराव जोशी, सावरकर आणि गडकरी या चार नाटकारांसंबंधीं लिहितानाच चिंतामणरावांच्या लेखन कौशल्याला खरा बहर आलेला असून तो मजकूर अत्यंत वाचनीय आहे. गडकरी हे तर चिंतामणरावांचे स्नेही आणि नाटककारच नव्हेत, तर त्यांच्या कारकीर्दीला यशाच्या शिखरावर नेऊन बसविणारे जादुगार ! गडकरी ही व्यक्ति, त्यांचें प्रसिद्ध झालेलें आणि संकल्पित वाङ्मय या संबंधांत चिंतामणरावांनीं जितक्या विस्तारानें आणि तळमळीनें लिहिलें आहे तितकें अद्याप कोणीही लिहिलेलें नाहीं.

चिंतामणराव हे मराठी रंगभूमीवरील एक कर्तबगार नट होते. किर्लोस्कर नाटक मंडळीच्या पडत्या काळांत हिंदी नाटकांच्या संजीवनीनें तिला जिवंत ठेवण्यांत त्यांनीं भाग घेतला होता. तात्यासाहेब केळकरांकडून त्यांचें पहिलें संगीत नाटक लिहून घेणें, ' राक्षसी महत्त्वाकांक्षे ' नंतर बारा वर्षे स्वस्थ बसलेल्या वामनराव जोशांकडून ' रणदुंदुभी ' नाटक लिहून घेणें, सावरकरांना नाट्यलेखनाला प्रवृत्त करणें, विश्राम बेडेकरां-सारख्या नव्या नाटककाराला उजेडांत आणणें–अशा अनेक गोष्टी त्यांनीं केल्या आहेत. सबब, या ग्रंथांत त्यांनीं स्वतःसंबंधें थोडासा गौरवात्मक मजकूर लिहिला नसता तर त्याला दांभिक शालीनतेचा दर्प आला असता. पण, " जें केलें तें सांगतांना " त्यांनीं संयम किंवा समतोलपणा सोडलेला नाहीं. चिंतामणरावांच्या शिक्षणाची वाटचाल शाळेच्या पलीकडे जाऊं शकली नाहीं. असें असून सुद्धां, त्यांनीं अतिशय पीळदार आणि कमावलेल्या भाषेंत हा ग्रंथ लिहिला आहे. ही भाषा रंगभूमीवर उभे राहून चिंतामणरावांनी कमाविली आहे हें लक्षांत घेतलें, म्हणजे त्यांच्या जमान्यांतील रंगभूमीवरील भाषेचें सामर्थ्य किती मोठें होतें त्याची प्रत्यय येतो.

आतांपर्यंत मराठी रंगभूमीवरील गणपतराव बोडस, गोविंदराव टेंबे आणि दादा साळू (वाळावलकर) यांनीच आत्मचरित्रात्मक लेखन केलें आहे. परंतु त्यांच्या लेखनापेक्षां चिंतामणरावांच्या या ग्रंथाची बैठक अगदी निराळी आहे. किंबहुना, केवळ नाटककारांसंबंधीं लिहिलेलें मराठींतलें हें पहिलेंच पुस्तक आहे. आत्मचरित्रात्मक लेखनाचें महत्त्व असें कीं त्यामुळें लेखक जो व्यवसाय करित असेल त्या व्यवसायाच्या इतिहासाचें साधन सहजगत्या निर्माण होतें. मात्र, लेखकानें सत्यार्शी प्रामाणिक राहिलें पाहिजे. आतांपर्यंत ज्या नटांनीं आत्मचरित्रात्मक लेखन केलें ते किर्लोस्कर नाटक मंडळी आणि तिच्या संप्रदायांतले नट आहेत. चिंतामणरावांचा कांहीं काल ' महाराष्ट्र ' आणि " भारत " नाटक मंडळींत गेला असला तरी त्यांच्या कारकीर्दीची खरी सुरुवात वृन्दावनाच्या भूमिकेनें किर्लोस्कर मंडळींतच झाली आणि त्यांची बलवंत नाटक मंडळी ही किर्लोस्कर मंडळीचीच शाखा होती. महाराष्ट्रांतील इतर नाट्यसंस्थांतील नटांनीं अद्याप असें लेखन केलें नाहीं.




सुशिक्षितांची म्हणून समजल्या केलेल्या महाराष्ट्र नाटक मंडळीसारख्या थोर नाट्य-संस्थेतील त्रिंबकराव कारखानीस, यशवंतराव टिपणीस, विष्णुपंत औंधकर आणि केशवराव दाते यांनीं सुद्धां आपली स्वतःची आणि आपल्या संस्थेची कथा न सांगितल्यामुळें मराठी रंगभूमीच्या एका महत्त्वाच्या आणि प्रभावी नाट्यशाखेचा इतिहास अजून गुलदस्तांतच राहिला असून त्याच्यावर विस्मृतीचा पडदा पडण्याचा संभव निर्माण झाला आहे!

—वसंत शांताराम देसाई.

## झोका

झोका' हा अच्युत बर्व्यांच्या कथांचा तिसरा संग्रह. तो वाचल्यानंतर एकदोन गोष्टी चटकन् जाणवतात. त्यापैकीं एक अशी कीं बर्व्यांच्य कथालेखनावर दोन लेखकांचा परिणाम झाला आहे. ना. सी. फडके व पु. भा. भावे हे ते दोन लेखक. त्यापैकीं, फडक्यांचा परिणाम अधिक दाट आहे. म्हणूनच बर्व्यांच्या कथाविश्वाचा बराचसा भाग सुखासीन वातावरणानें भरलेला आहे. त्यांतील नायक-नायिका सुंदर, श्रीमंत अससात—आणि एकमेकांच्या कौतुकांत दंग असतात. बर्वे हें कौतुक नाजुकपणें रंगवितात, स्वतःहि त्यांत जरा अधिक रंगतात. केवळ या वर्णनाची 'कथा' होऊं शकत नाहीं, म्हणूनच कथेंत कांहींतरी 'घडतें'. त्यामुळें हें घडणें स्वाभाविक वाटत नाहीं. या सुखासीन वातावरणांत शोक अवतरतो तो असा 'गरज' म्हणून. 'हुंदका' या कथेंतील पत्नीचा मृत्यु असा 'गरजे' पोटींच घडला आहे. त्यामुळें बर्व्यांच्या अशा प्रकारच्या कथा मनाला भिडत नाहींत. त्या सपाट वाटतात. त्यांतील व्यथा खोट्या नव्हेत, तरी क्षुल्लक वाटतात. 'कोळीण' ही कथा या दृष्टीनें पहावी. 'कुरुपतेची कोंडी फोडणें' ही त्यांतील नायिकेची व्यथा. फडक्यांच्या नायिकेची व्यथा अशीच कांहींशी असणार नाहीं का?

या कथांच्या बहिरंगावरहि फडक्यांचा परिणाम आहे. शीर्षकांवर, संभाषणांवर, एकूण शैलीवर. दुर्बोध, गूढ शीर्षकांचें समर्थन करूं नये—पण 'सहज कशी खेळविते' 'विडा न रंगे कातावीण' वगैरे शीर्षकांचें युग संपलें, हेंहि कबूल करावें. तशीं शीर्षकें फडक्यांच्या कथांनाच शोभतात! 'ओळख' सारखी सुरेख कथा लिहिणाऱ्या बर्व्यांनीं असें कांहीं करूं नये असें वाटतें. फडके-छाप संभाषणांचीं उदाहरणें हवी तेवढीं. 'हुंदका' ही कथा कंडक्टर आणि नायक यांच्यांतील संभाषणांत उगाच पानभर रेंगाळते. हा पसरटपणा आणखी कांहीं ठिकाणींहि शिरतो. नायक-नायिकांच्या भेटी पुन्हा पुन्हा घडल्याखेरीज कथेला आकारच येत नाहीं.

—आणि या सर्व कारणांमुळें बर्व्यांच्या कथा उत्कट वाटत नाहींत. मागे 'सत्यकथे' च्या दिवाळी अंकांत बर्व्यांची 'व्यथा' नांवाची एक कथा प्रसिद्ध झाली होती. तें एक उत्कृष्ट क्षणचित्र होतें—आणि त्यांतील 'व्यथा' हि खरी होती. मग बर्व्यांच्या लेखनांत नव्यानेंच हा फडके-छाप सुरवातीनपणा का शिरूं पाहात आहे? तो वेळींच नाहींसा झाला तर बरें!

'द्रौपदी,' 'दिव्य,' 'सहज कशी खेळविते' या कथा वाचल्यावर भाव्यांची आठवण होते. त्यांतील नायक रंगेल आहेत, नायिका धीट आहेत, खलनायक विकृत आहेत—आणि वातावरण धुंद आहे. भाव्यांच्या कांहीं कथांतून जसें याहून अधिक कांहींच गवसत नाहीं, तसें बर्व्यांच्या कथांतूनहि गवसत नाहीं. या कथांवर जीवनाचीं खरीं पावलें कधींच उमटत नाहींत. तो केवळ एक जमविलेला संच वाटतो.

या 'जमवाजमवी' कडून बर्वे स्वाभाविक सुखदुःखाकडे वळतात, ते 'पाठीराखा' 'शेजार' वगैरे कथांत. त्यांतील प्रसंग, संभाषणें वगैरे सर्व खरें वाटतें. पण बर्वे अशा कथावस्तूंशी एकजीव होत नाहींत. गाडगीळ अशा कथावस्तूंना जणू दंश करतात—बर्वे त्यांच्यावरून फक्त हात फिरवतात. अर्थात् बर्व्यांच्या लेखणींत तो दंश नाहीं असें नाहीं. कारण 'साठ-तीन-एकशेवीस' या कथेंत तो निश्चित जाणवला आहे.

'साठ-तीन-एकशेवीस' 'ओखळ' 'व्यथा' या बर्व्यांच्या कथा मला अजून आठवतात. तेथें स्वतः बर्व्यांचे गुणदोष आहेत. म्हणूनच वाटतें, 'झोका' मध्यें दिसते तें नुसतें फडके-भाव्यांचें मळभ. तें कधींतरी निघून जाणार आहे—आणि पुन्हा एकदा बर्वे सुरेख कथा लिहिणार आहेत.

—विजया राजाध्यक्ष



देवाचिया द्वारीं उभा क्षणभरि।
दृष्टी खालीं लावी भूमीवरी॥
'हरि मुखें म्हणा' हरदास म्हणे।
नामाच्या गजरें मान तुरे॥
चाललें कीर्तन, चाललें श्रवण।
दिवलें सुबक पादत्राण॥
वाजवुनि घंटा करुनि प्राशन।
तीर्थ, देई दान याचकासी॥
घाली प्रदक्षिणा, (पायी नारायण)।
त्याच पादत्राणा घाली पाय॥
भक्त तो निघाला सपाद रुत्राण।
जागृत तो देव भक्ता पावे॥ १॥

—शां. शं. रेगे

## यांत्रिकाचीं यात्रा

औद्योगिक क्षेत्रांत अजून महाराष्ट्र मागासलेला आहे. याला कारण दारिद्र्य आणि चिकाटीचा अभाव. त्यामुळें किर्लोस्करांचें उदाहरण म्हणजे मराठी माणसाचें एक आशास्थान. दक्षिण सातारा जिल्ह्यांतील एका आडवळणीं स्टेशनाजवळच्या खेड्यांत एका कर्तृत्ववान माणसानें आपल्या उद्योगाचा पसारा मांडला आणि महाराष्ट्राचें एक स्वप्न प्रत्यक्षांत अंमलांत आणलें. तें कर्तृत्व एवढें कीं, 'किर्लोस्कर' हें नांव महाराष्ट्राच्या घरा-घरांत पोंचलें. किर्लोस्कर नांगरांचे फाळ महाराष्ट्राच्या शेतजमिनींत शिरले पण त्यांनीं त्याठिकाणीं उद्योगशीलतेला अनुकूल अशी भूमिका तयार केली. महाराष्ट्राचे लोकप्रिय 'शं. वा. कि.' यांनीं आपल्या ओघवत्या लेखनशैलींत महाराष्ट्राचे फोर्ड श्री. लक्ष्मणराव किर्लोस्कर यांचें हें स्फूर्तिदायक चरित्र मराठी तरुणांसमोर ठेवलें आहे तें प्रत्येक महत्त्वाकांक्षी तरुणानें कित्त्यासारखें आदर्श मानलें पाहिजे,



चा पुढील अंक म्हणजे चैत्राची नवलाई.



लक्ष्मणरावांचें चरित्र रोमांचकारी प्रसंगांनीं खच्चून भरलें आहे. ड्रॉइंगची कोणतीहि उच्च परिक्षा पास न झालेला एक तरुण माणूस व्ही. जे. टी. आय. मध्यें ड्रॉइंग टीचर म्हणून नोकरी मिळवतो, ती वशिल्यापेक्षां स्वतःच्या कर्तृत्वावर. शेवटीं स्वाभिमानानें त्या नोकरीवर लाथ मारून लक्ष्मणरावांनीं किर्लोस्कर नांगराची कल्पना प्रत्यक्षांत उतरवली आणि औद्योगिक महाराष्ट्राचें एक नवें पर्व सुरू केलें. किर्लोस्कर नांगरांपासून किर्लोस्कर ऑईल इंजिनचा इतिहास म्हणजे लक्ष्मणरावांच्या दुर्दम्य कर्तृत्वाचा धांवता आराखडा. कोणतीहि गोष्ट अंगावर घेतली कीं तिचा पिच्छा पुरवून ती पूर्णत्वाला नेण्याचा त्यांचा ध्यास दरक्षेत्रांत त्यांना यशदायी ठरला. किर्लोस्कर वाडीच्या माळावर द्राक्षांचा मळा पिकविण्याची स्फूर्ति त्यांनीं रावसाहेब शेंबेकरांकडून घेतली आणि थोडक्याच काळांत शेंबेकरांना किर्लोस्करवाडीची द्राक्षें खायला बोलावलें.

औंधची दिवाणगिरीचें पद भूषविणाऱ्या या उद्योगी माणसानें जनहित आणि जनसंवर्धनाची सदैव तमा बाळगली. स्वभावानें तापट असणारें हें अंतर्यामीनें प्रेमळ हृदय किर्लोस्कर वाडीच्या कामगारांचें जीव कीं प्राण होतें अशी साक्ष या चरित्रावरून पटते.

मराठींत अशा तऱ्हेच्या व्यक्तींची चरित्रें हाताच्या बोटांवर मोजण्याइतकींच आहेत. त्यामुळें 'शं. वा. कि.' यांचा हा प्रयत्न निःसंशय अभिनंदनीय.

—बाळ सामंत











# स्त्रिया आणि स्वयंपाक

—बाळ सामंत

बायका भांडणं करण्यांत पटाईत असतात,—
बायका नट्टापट्टा करण्यांत सदैव मशगूल असतात—

वाटल्यास बायका सुंदर असतात—मोहक असतात असं म्हणा—या सर्व अफवांवर विश्वास ठेवायला मी तयार आहे, पण—'बायकांना उत्तम स्वयंपाक करतां येतो—'

——असं म्हणणं म्हणजे स्त्रियांची नाहक बदनामी, स्त्री जातीवरील खोटं बालंट आणि नसतं कुभांड आहे. माझ्या या विधानामुळें महिला मंडळाचे सदस्य, स्त्रीज्ञातीचे लबाड कैवारी चवताळून एकच गिल्ला करतील, पण बायकांना स्वयंपाक करतां येतो या बातमीवर विश्वास ठेवायला आपण मुळींच तयार नाहीं.

सकाळीं ९-२५ ची लोकल पकडणाऱ्या कु. सुनंदा, सुलभा, सुमन किंवा मिसेस साने, गोखले आदि ऑफिसांतील लोकप्रिय मंडळींनीं कितीहि आरडाओरडा करून सांगितलं कीं आम्हाला पोळ्या लाटतां येतात, भात करतां येतो, भाजी बनवतां येते—कीं खुशाल समजा—त्या तुम्हाला हातोहात बनवताहेत. भात करपवणं, बटाटे उकडून त्याची भाजी नांवांचा पदार्थ करणं आणि खारट आमटी करणं म्हणजे स्वैंपाक नव्हे. गेलीं शेंकडों वर्षें आमच्या बायका स्वैंपाक करत आहेत, पण भात भाजी आणि आमटी या पलीकडे आमच्यापुढें दुसरा 'मेन्यू' नाहीं. बटाटे आणि बायका यांचा निकट संबंध आहे. या बटाट्यांना आणून त्यांना होरपळून अगर उकडून आमच्या समोर ठेवले कीं झाली भाजी तयार. भाताची करुण कहाणी तर रोजचीच. आमटी ही कशाची केली आहे हा एक विद्यापीठीय संशोधनाचा विषय आहे.

अशा अवस्थेंत स्त्रियांना स्वयंपाक करतां येतो हें म्हणणं किती धाडसाचं आहे! वनवासी पांडवांना विराट राजाच्या दरबारांत बल्लवाची भूमिका बलवान भीमाला घ्यावी लागली, नाजूक द्रौपदीला नव्हे, हा पौराणिक दाखला हें काम स्त्रियांचें नव्हे हें पुराव्यानिशींच सिद्ध करतो. अहो, शंभर माणसांचा स्वयंपाक करणं म्हणजे काय चेष्टा आहे! चुलीवरचा तो अगडबंब टोप आमचा आचारी जिथं लीलेनें उचलतो तिथं तेंच काम करायला बायकांची फलटण आणून उभी करावी लागेल.

बायकांना स्वयंपाक करतां येणं अशक्य आहे आणि त्या विषयांत त्यांना कोणी विचारीत नाहीं, याचा आणखी एक पुरावा म्हणजे कोणत्याहि मोठ्या हॉटेलांत अगर खानावळींत आचारी म्हणून स्त्रियांची नेमणूक होत नाहीं. अशोक हॉटेलापासून तो मामा भटाच्या खानावळीपर्यंत सर्वत्र या लोकप्रिय धंद्याची सूत्रें आजतागायत पुरुषवर्गाकडेच आहेत. याचें कारण असें कीं स्वयंपाक म्हणजे कला आणि शास्त्र यांचा सुरेख संगम. त्यांतल्या शास्त्र या विषयांशीं बायकांचें जन्माचे हाडवैर. कॉलेजांत सायन्स साईडपेक्षां आर्टस् साईडलाच पोरींची फटावळ फार असते ही सत्यस्थिति ही गोष्ट सिद्ध करायला पुरेशी आहे. पण स्वयंपाक नुसतेंच शास्त्र नसून त्यांत अनेक शास्त्रांचा संगम झालाय. अर्थशास्त्र, वनस्पतीशास्त्र, फिजिक्स या सर्वांचा समावेश स्वयंपाकांत होतो. त्यांतल्या पहिल्या अर्थशास्त्रांचा आणि बायकांचा उभ्या जन्माचा दावा. जगांतील सर्व अनर्थाचे मूळ अशी जी बाई ते एक मोठंच अनर्थशास्त्र. बायका काटकसरी असतात असा एक बोभाटा कांहीं बायल्या पुरुषांनीं केलाय. पातळांसाठीं सर्वस्व गमावणाऱ्या या बायका दोन नया पैशासाठीं भाजीवालीकडे तीन तास तंटत बसतात, ही यांची काटकसर. आपण फार काटकसरी आहोंत म्हणून बायकांनीं खरेदीचा मक्ता आपल्या हातीं घेतला आणि त्यामुळें झाला पगाराचा सत्यानाश आणि झाली घरांत नसत्या वस्तूंची अडगळ. वरवरच्या रंगावर भुलणाऱ्या या स्त्रिया पाणी मारून ताजी टवटवीत केलेली शिळी भाजी घरीं आणतात. भाजीपाल्याच्या बाबतींत स्वस्ताईवर त्यांचा फारच कटाक्ष असतो, त्यामुळें स्वैंपाकाचे नेहमींच बारा वाजतात. स्वयंपाकांत आणखी एक महत्त्वाचें शास्त्र म्हणजे फिजिक्स. उष्णता, उकळण्याची क्रिया, वाफेचीं मूलतत्त्वें या गोष्टी नीट माहित असल्याशिवाय जेवण कसं करतां येणार ? पण या शास्त्रांची ओळख करून घेण्याच्या भानगडींत आमच्या बायका कधींच पडत नसल्यामुळें गिचगोळा भात, कच्ची भाजी आणि करपलेली आमटी हें दुर्दैव पुरुषांच्या मागें सदैव हात धुऊन लागलें आहे.

उत्तम स्वयंपाक करायला उद्योगशीलता पाहिजे. पण आळशीपणा आणि बायका यांची आमरण मैत्री. आळसटलेली, धुंद डोळ्याची अगर आळोखेपिळोखे देणारी रमणी सुंदर दिसत असेल, पण सुंदर स्वैंपाक कसा होणार तिच्या हातून ?

वास्तविक पाहातां उत्तम भाजी म्हणजे एक उत्कृष्ट लघुकथा आहे, चविष्ट मटण म्हणजे रसरशीत ग्रामीण कादंबरी आणि छानदार कोशिंबीर म्हणजे भावपूर्ण कविता. पण वर्षानुवर्षें स्वैंपाकाचा धंदा चालवून आमच्या गृहिणी अजून या विषयांत मागासलेल्या आहेत. आपल्या घरीं हजार पाकक्रिया किंवा आजचे पदार्थ यांचीं कात्रणें रगड आहेत, पण त्याचा प्रयोग घरीं कधींच होत नाहीं. शोध घेता असें कळलें कीं, या नव्या पदार्थांच्या कवयित्री हा प्रयोग स्वतःहि कधींच करीत नाहींत. गेलीं कित्येक वर्षें आमचा पाहुणचार म्हणजे चहा आणि बटाटेपोहे. यांतले बटाटेपोहे आमच्या जन्मालाच चिकटले आहेत. कोणत्याहि घरीं केव्हांहि जा, हे बटाटेपोहे आपले ठेवलेलेच. बटाटेवडा, इडली, मिसळ, समोसे हे कोणत्याहि घरीं खाल्ल्याचें मला अजून आठवत नाहीं. हॉटेलांतले हें पदार्थ चांगले असतात असं म्हटलं कीं ते महागडे असतात म्हणे. वास्तविक पाहातां बटाटेवडे अगर मिसळ बनवायला फारशी अक्कल लागत नाहीं किंवा फार खर्च येत नाहीं, पण यांचं सदैव लक्ष नवऱ्याच्या हालचालींत गुंतलेलं असल्यामुळें हा उद्योग करतो कोण ?

आम्हाला स्वैंपाक करतां येतो असें बायकांनीं सांगणं म्हणजे मोठेपणा नव्हे. त्या लाजतात, मुरकतात, नटतात त्याप्रमाणें जेवण करणें हा त्यांचा धर्मच आहे. तें आलं नाहीं तर मात्र गुन्हा आहे हा. पण डाळ भात भाजी या तीन निरुपद्रवी वस्तु वेड्यावांकड्या उकडणं म्हणजे म्हणजे स्वयंपाक नव्हे. मला वाईट वाटतं कीं वर्षानुवर्षें आमच्या बायका हा उद्योग करताहेत पण अजून त्यांत सुधारणा नाहीं.

या स्त्रियांच्या खास क्षेत्रांत जर कां आम्ही पुरुषांनीं पडायचं ठरवलं तर स्त्रियांची काय दैना उडेल याची कल्पनाच मला करवत नाहीं—त्यामुळें इथेंच पुरे.

● ●



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका








**मं. वि. राजाध्यक्ष**



*स्टीव्हन्सन्‌नें केव्हांच लिहून ठेवलें आहे——*

*—जो धूम्रपान करीत नाहीं अशा पुरुषाशीं स्त्रीनें कधींच लग्न करूं नये—*

..........................................

# धूम्रपान आणि संसार सुख

आर्यावर्तांत सज्जनपणाचा मार्ग मोठा खडतर आहे; काय करावें यापेक्षां काय करूं नये याचा बडिवार अधिक, पाप चुकवील तो पुण्यवान् अशा पापांपैकींच एक धूम्रपानाचें; तसें थोडें मामुलीच. अगदीं बाळबोध नसलें तरी आळीमिळीचा घोळ घालण्यांइतकें फाजीलही नाहीं. सुपारीच्या खांडाचेंही व्यसन नसणारा संपूर्ण संत. पण एकदां जणू पापाला सुपारी दिली कीं संतपणाला गळती लागते. सुपारी झांकायला पान; त्या उभयतांचें सार्थक करायला तंबाखू; मग तंबाखूचा धूर;—अशी घसरगुंडी कोणी भावडे मानतात. पण तंबाखू ओढण्यापूर्वीं तो खाल्ला (अथवा थुंकला) पाहिजे असें नाहीं. "वरच्या" समजल्या जाणाऱ्या वर्गांत, म्हणजे शिष्टपणाच्या परिटघडींत, तंबाखू ओढणें हा काणाडोळा करण्याचा सैलपणा म्हणून खपतो; पण तो खाण्याविरुद्ध कटाक्ष असतो—त्यांत जरा उघड रंगेलपणा आहे म्हणून तो हलका प्रकार. व्यसनांतही वर्णव्यवस्था चुकलेली नाहीं जणू! अर्थात् हें सगळें सव्यापसव्य बापड्या मध्यमवर्गाचें. संभावितपणाचें कंत्राट त्यानेंच आजवर सांभाळलें.

पण नाहीं म्हटलें तरी आतां तें कंत्राट पूर्वीइतकें कडक राहिलेलें नाहीं. मागील एकदोन पिढ्यांत त्याचा केवढा धाक असे. पुरुषांनीं डोक्यावरचे केस राखणें अथवा (कुल) स्त्रियानीं पायांत घालणें हीं सुद्धां बदकर्में होतीं. तीं चोरून तरी कशीं करणार? इतर बहुतेक पापें चोरून करतां येतात—म्हणून त्यांत धाडसाची लज्जत येते! दारू पळीपंचपात्रीमधून घेतां येते, आणि दृष्टीआड घेतली तर खरोखरोच सृष्टीआड! तिचा वास मारण्याचे उपाय आहेत पण धूम्रपानाचें तसें नाहीं. चोरून केलें तरी दुसऱ्या डोळ्यांत तें भरतें आणि करण्यापूर्वीच त्याला ठसका लागतो. मी इंग्रजी पहिल्या इयत्तेंत होतों तेव्हांची गोष्ट. एके दिवशीं वरच्या इयत्तेंतील एका विद्यार्थ्याच्या गळ्यांत 'मी सिगरेट ओढली' असा कबुलीजबाब लिहिलेली पाटी अडकवून त्याची वर्गांतून हेडमास्तरांनीं धिंड काढली. माझ्यासारख्याला तर त्या मुलानें केलेल्या अपराधापेक्षां हेडमास्तरांचीच अधिक भीति वाटूं लागली. असो. पुढें समजलें कीं मशारनिल्हे गुन्हेगार लघुशंकेच्या सबबीआडून शौचकूपांत गुन्हा करतांना पकडला गेला. 'यत्र यत्र धूमस्तत्र तत्र वन्हिः' हें प्राथमिक अनुमान त्याला माहीत नव्हतें, हा खरोखर त्याचा अपराध. आमच्या बाळबुद्धीवर तें सहज ठसलें. विनधुराच्या दारूप्रमाणें विनवासाची दारू कां नाहीं असें तळिराम विचारतो; तद्वत् विनधुराची तंबाखू कां नाहीं अशी शंका त्या पश्चात्तप्त (दिसणाऱ्या) मुलाच्या मनांत आली असणार...

पण मोठेपणीं त्या खुळचट शंकेची त्याला लाज वाटली असेल. आपण तंबाखू ओढतों म्हणजे धूर ओढतों. तोंड–घसा–छाती–नाक इत्यादी भागांइतकेंच डोळ्यांनाही सुख असतें. म्हणूनच 'अंधारांत तंबाखू ओढणें व्यर्थ आहे' असें कोणी साहेब बोलून गेला. आरामांत रेलून आपण धुराचे कुरळे तरंग सोडीत आहोंत—ते आळोख्या पिळोख्यानीं हें आंबलेलें जग आपल्या डोळ्यांआड लकटीत आहेत—त्या धुराच्या पिसांनी आपणहि कोठें चढत आहोंत...अंधारांत हें उड्डाण कसें जमणार? नाकातोंडांतून धूर निघतो या चमत्कारानें मुलें भारावतात (त्या आकर्षणांतून अनुकरणाची ईर्ष्या बळावते)...पण ओढणाराही भारावतो; त्याचें मूलपण जागें होतें आणि वागडूं लागतें. कलावंतांत एवढें धूम्रपान आढळतें तें कदाचित् यामुळेंच असावें! धुरानें जणू बुद्धि स्वच्छ होते, स्थिर आणि एकाग्र होते. धूपच म्हणाना!

खरें म्हणजे तंबाखू ओढायला प्रथम मेक्सिकोंत सुरवात झाली ती धार्मिक कार्यासाठींच. त्याशिवाय म्हणे देवतेशीं एकरूप होता येत नसे, समाधी लागत नसे. आपल्याकडेहि प्राचीन काळीं समाधीसाठी—

अनुक्रमणिका







जीवात्म्याभोंवतीच्या कुडीचे पाश ढिले करण्यासाठीं—चांगलेचुंगले उपाय असत, पण त्यांत तंबाखू नसावा. धूर काढण्याच्या कसल्या तरी नळीचा बाणभट्टानें उल्लेख केला आहे—पण तें खरें नव्हे. तंबाखू हिंदुस्थानांत आला तो सतराव्या शतकाच्या आरंभीं पोर्तुगिजांनी आणला. प्रथम दक्षिणेंत आणि तेथून कोण्या हकीमानें उत्तरेस अकबराच्या दरबारापर्यंत पोंचवला. बादशहाला पसंत पडला पण राजवैद्यानें नको म्हटलें. जहांगीरनें त्याला मनाई केली, पण शहाजहाननें ती उठविली आणि राजमान्य होतांच पाहतां पाहतां तो लोकमान्य झाला.

यूरोपमध्यें तो साठसत्तर वर्षें अगोदर पोंचला होता. खलाशांनीं मध्य आणि दक्षिण अमेरिकेंतून आणलेली ही चिमुकली चूष स्पॅनिश लोकांनी उचलली; पुढें ती उत्तरेच्या मार्गाला लागली, आणि फ्रान्स-इंग्लंडनें तिचें स्वागत केलें. सुखासाठीं करावयाच्या गोष्टीला आरोग्यप्रदतेचा मुखवटा चढविण्याचा संभावितपणा तेथेंही झाला. असा प्रवाद कोणी उठवला कीं पोटाच्या समस्त रोगांवर ही गुणकारी दवा आहे. दम्यासाठींहि तो अक्सीर इलाज मानला गेला. १६६५ च्या लंडनमधील प्लेगांत उंदरासारखी माणसें मेलीं; तेव्हां तंबाखूच्या दुकानांत उंदीर पडत नाहींत असा बभ्रा झाला. परिचारक आणि मुडदेफरास अग्निहोत्र घेतल्यासारखें अखंड धूम्रपान करीत. इतकेंच नव्हे तर ईटनच्या शाळेंत मुलांना प्रातःकाळीं सामुदायिक धूम्रपान करावयास लावीत !

पण तंबाखूचा हा औषधी बोलबाला लौकरच ओसरला; उलट अनेक रोगांचा त्याच्याशीं संबंध जोडून त्याची बदनामी होऊं लागली; ती अजून थांबली नाहीं. गेल्या शतकांत युरोपांतील नीतिखोरांनी त्याच्यावर नकोनको ते आरोप केले—सांगण्यासारखे आणि न सांगण्यासारखेहि. स्वित्झर्लंडमधील एका शहरानें तर धूम्रपान आणि व्यभिचार हे समान गुन्हे मानले. त्या शतकांतील कथा : खुनाच्या घोर आरोपांतून एका तरुण आरोपीची न्यायाधिशानें मुक्तता केली ती याच मुद्यावर कीं, " धूम्रपानानें त्याचा बुद्धिभ्रंश झाला होता..." आतां काळ थोडा पालटला आहे; तंबाखूला इतक्या शारीरिक आणि मानसिक व्याधींची जबाबदारी पेलावी लागत नाहीं. पण कॅन्सरशीं त्याचा दाट संबंध असल्याचा बोभाटा हल्लीं फार होऊं लागला आहे. हौशी डॉक्टर तो विशेष करतात, आणि त्यांचा बुजबुजाट फार झाला आहे. तसेंच स्त्रियाही नवरा खोकला तर तें सिगरेटमुळें; त्याला झोंप लागली नाहीं तर ती ( स्वतःमुळे नसून ) सिगरेटमुळें; फार लागली तर तीहि तिच्यामुळेंच. घशाचें आणि खिशाचें म्हणे मातेरें होतें ! राखेचे कण कोठें उडले तर ते पतिव्रता—दृष्टीनें टिपून घेतले जातात. म्हणून अमेरिकेंत धूम्रपान–प्रतिबंध–प्रचारक मंडळ्या आहेत त्या मुख्यतः स्त्रियांच्याच ! तसले पुरुष आपल्याकडे खूप आहेत. त्या प्रकृतीच्या एका देशभक्तानें धूम्रपानबंदी करण्याचा पवित्र इरादा एकदां बोलून दाखविला होता.

पण हे जसे स्त्रीप्राय पुरुष तशा पुरुषप्राय स्त्रियाहि असतात. युरोपांत जेव्हां प्रथम स्पेनमधें धूम्रपान आलें तेव्हां स्त्रियांनीहि मुक्तकंठानें त्याचा सत्कार केला. पण ब्रिटिश स्त्रियांनी मात्र त्याला नाकें मुरडलीं. मरहूम व्हिक्टोरिया राणीच्या काळांत तर पुरुषानें स्त्रियांच्या पुढ्यांत धूम्रपान करणें अशिष्ट मानलें जाई. पहिल्या महायुद्धानंतर शिष्टाशिष्टतेच्या आडाख्यांची मोठी उलटापालट झाली. 'कुलिन ' स्त्रिया पर्समधें सिगरेट बाळगूं लागल्या. दुसऱ्या महायुद्धानें आणखी बेडरपणा आणला. आतां त्या पाईप ओढूं लागल्या आहेत. आपल्याकडे उघडपावर धूम्रपान करणाऱ्या स्त्रिया अजून इतरांनीं बोटें दाखवावींत इतक्या थोड्या आहेत—म्हणजे उच्च ( पोशाखांतील ) स्त्रिया. कोळणी तर राजरोस विडी-सिगरेट ओढतात. त्यांना याबाबत उपदेश करण्याचा खटाटोप कोणी करूं नये हेंच बरें. त्यांच्या भाषाशैलीला तोंड द्यावें लागेल. कोळणीवरून आठवलें. कांहीं वर्षांपूर्वी एका ( अमेरिकन ) विद्वानानें धूम्रपानाबाबत प्रश्नपत्रिका पाठवून आंकडेवारी जमविली. तिचा एक निष्कर्ष असा कीं अखंड धूम्रपान करणाऱ्या सर्व स्त्रिया या 'स्त्री–लेखिका ' होत्या. 'धुमसणाऱ्या ' हा मराठी शब्द वापरणार होतों, पण अतिव्याप्तीचा दोष घडला असता; 'लेखिका ' हें उत्तरपद व्यर्थ ठरतें ! खरेंच, या जोडशब्दांत उपपद ( म्हणजे गौणपद ) कोणतें, स्त्री कीं लेखिका ?

मुळांत 'तंबाखू 'चें लिंग कोणतें ? मी येथवर तो शब्द पुल्लिंगांत वापरला तो केवळ संवयीनें. नानासाहेब कुळकर्ण्यांचा भलामोठा व्युत्पत्तीकोश छातीवर हात मारून 'स्त्री-लिंग ' असें म्हणतो; पुण्याचा सतखंडी शब्दकोश सावधपणें पु० आणि स्त्री० हीं दोन्हीं लिंगें मानतो. नाना देशावरचे; शब्दकोशकार कोंकणपट्टीचे असें नांवावरून वाटतें. भूगोल भेदानें लिंगभेद होतो का ? नानांनीं इतका वर्षें भाषाशास्त्राबरोबरीनें तंबाखू मळण्याचा आणि चघळण्याचा व्यासंग केला आहे हाहि अधिकार मी मानतों. कोशांत त्यांनीं तंबाखूला पंचवीस ओळी दिल्या आहेत त्या आपुलकीशिवाय नव्हेत. त्यामुळेंच त्या शब्दाचें 'टो+बाको ' या ऑस्ट्रिक शब्दाशीं साम्य 'चिन्त्य ' असल्याचें त्यांनीं कळकळीनें सांगितलें असावें. वर्फावरून घसरत जाण्यासाठीं टॉबॉगॉन नांवाचें लाकडी फळकूट अमेरिकेंतील इंडियन वापरतात. त्या गारठणाऱ्या खेळांत अंगांत ऊब रहावी म्हणून तर पूर्वी तंबाखू वापरली जात नसेल ?

ही ऊब तंबाखू खाऊन अधिक येते कीं ओढून ? वादाचा, अगदीं परिसंवादाचा, विषय आहे. सामना तिरंगी होईल; कारण तपकीर हा तंबाखूचा तिसरा प्रकार आहेच. अर्थात माझा कौल ओढण्याच्या बाजूनें. अग्नि शुद्ध करतो ही आपल्या संस्कृतीची प्राथमिक श्रद्धा आहे. तंबाखूंत कांहीं किल्मिषें असतील तर तीं काडी लावतांच नष्ट होतात. पण आपल्या पारशी बंधूंच्या मतें उलट अग्नीच विटाळतो, म्हणून त्या अग्निपूजकानीं धूम्रपानाचा कडक निषेध केला आहे. शिखांतहि आहे पण तो जाळपोळीच्या धोक्यामुळें असावा. फार प्राचीनकाळी कांहीं माणसें धूम्रपान करीत ती म्हणे अशासाठीं कीं दुष्मनाला वाटावें हा वेडा अग्निभक्षक



कोण म्हणतो मोरोपंत महाकवि ?

अनुक्रमणिका

आहे. इंग्लंडांतील आद्य धूम्रपानी वॉल्टर रॅले हा तें कर्म करीत असतां त्याच्या चाकरास भासलें कीं आपल्या धन्याच्या तोंडास आग लागली आहे; या कारणानें त्यानें धन्यास बिअर नीमें दारूनें सचैल स्नान घातलें. याला काय म्हणावें ? व्यसनानें व्यसन काढणें ? पण, बिअरनें अग्नि प्रज्वलीत होतो म्हणतात... अर्थात् तो आंतरिक अग्नि !

या धूम्रसाधनेच्या विविध रीति आहेत, अनेक तंत्रें आहेत, पण अंतीं ब्रह्म एकलेंच ! कोणी सिगरेट ओढतो, कोणी किंमती सिगार, कोणी साधी विडी; यांत तंबाखूशीं सरळ तोंडीं व्यवहार आहे. पण तो टाळण्यासाठीं कोणी चिलीम, गुडगुडी, हुक्का, पाईप इत्यादि मातीचीं वा लाकडी आयुधें वापरतात. कोणी तंबाखू शुद्ध स्वरूपांत भस्मीभूत करतो, कोणी गुळासारखे सोज्वळ अथवा अफूसारखे मादक पदार्थ मिसळतो. चिलिम–गुडगुडीचा हुक्का हा यवनी म्हणून नक्षीदार आणि नखरेल अवतार; बैठकींत बिरादरी जमायला उत्तम ! चिरुट उघड्या तोंडाचा तर सिगारला तोंड फोडावें लागतें—असले बारीक भेद आहेत. पाईप हा यांतील सर्वांत भारदस्त आणि ( ताजा शब्द वापरायचा म्हणजे ) दर्जेदार प्रकार. त्याचे आकारविल्हानें गुणधर्म, तो पेटवावा कसा, तोंडांत धरावा कसा आणि वापरांत नसतां ठेवावा कसा याविषयीं साहेबानें मोठें कर्मकांड रचलें आहे. जातिवंत धूम्रपानी कधीं एकच पाईप ठेवत नाहीं. निदान पांचदहा बाळगतो. मेंकेन या अमेरिकन विनोदी लेखकाजवळ शंभर असत...यांत विनोद नाहीं.

पण हें सगळें कशाला ? तंबाखूची राख होत असतांना त्याचा धूर ओढणें आणि सोडणें यांत कसलें सुख आहे ? तें शब्दांत नाहीं सांगतां येणार—आणि तें लहानसहान कृतींतहि आहे. सिगरेटची अथवा सिगारची राख झाडण्यांतील सूक्ष्म कला आणि कलानंद जाणत्यालाच ठावा ! फ्रॉइडपंथी मनोविश्लेषणकार सांगतात कीं लहान मूल अंगठा ज्यासाठीं चोखतें—त्यांत लैंगिक प्रवृत्तीला निरोगी वाव मिळतो. भोजनान्ती तंबाखूची तलफ कां येते ? पचनक्रियेला मदत म्हणून कीं गृहिणीच्या कौशल्यामुळें तोंडांत रेंगाळत राहिलेले वास घालविण्यासाठीं ? दोन्ही शक्य आहेत. पण मानवजातींत स्नेह-भाव वाढावा हा सामाजिक हेतूहि त्यांत आहे. विडीकाडीनें माणसाला माणूस जोडतां येतो—न बोलतां एकत्र धूम्रपान केलें तरी गोडवा येतो. मग काडी आपली आणि विडी दुसऱ्याची असा व्यवहारी शहाणपणा एकानें दाखविला तरी हरकत नाहीं. साहित्यिक जमातींत हेंहि शहाणपण फार असा माझा अनुभव आहे. पण ज्याची विडी त्याला फुकटेपणाचा त्याक्षणीं तरी राग येत नाहीं. असल्या क्षुल्लक हिशेबापार, सगळ्या क्षुद्रपणापार, तो पोंचलेला असतो. गृहिणी या दातृत्वानेंहि तापते—तो तिचा धर्म. तिच्यासाठीं स्टीव्हन्सननें केव्हांच लिहून ठेवलें आहे—"जो धूम्रपान करीत नाहीं अशा पुरुषाशीं स्त्रीनें कधीं लग्न करूं नये." या उपदेशाचा पूर्वार्ध मद्यपानासंबंधी आहे; पण तो येथें अप्रस्तुत आहे. वरील उपदेश स्त्रियांनी सदैव मनांत बाळगावा. तो त्यांच्याच हिताचा आहे. धूम्रपान करणारा नवरा संसाराचें जोखड अधिक सोशिकपणें वागवतो, तक्रार करीत नाहीं, आंबल्यासारखा दिसत नाहीं.कांहीं बोलायला अवसर मिळत नाहीं हें न दाखवितां धूम्रपानाच्या उस्तवारींत आणि नशेंत बोलायला सवड नाहीं असा बहाणा तो करतो; आणि बहाण्याशिवाय संसारसुख कोठलें ?

• •

---



# जहांगीर आणि मद्यपान

आज माझा मुलगा खुर्रम याचा वाढदिवस. त्याला २५ वर्षे पूर्ण झाली. त्याचं लग्न झालंय, त्याला मुलंहि आहेत, पण मद्य पिण्याची त्याला संवय नाहीं. आज मात्र मी त्याला म्हटलं, "तूं आतां मोठा झाला आहेस, चांगला पोराबाळांचा बाप आहेस. आज तुझ्याबरोबर मी मद्य घेणार. माझ्यासमोर तुला मद्य घेण्यास कांहींच हरकत नाहीं. अति मद्यपान करून भ्रमिष्टासारखं वागणं केव्हांहि वाईट. मित मद्यपानाचेहि कांहीं चांगले फायदे आहेत."

वयाच्या चौदाव्या वर्षापर्यंत मी मद्याला स्पर्श केला नव्हता. लहानपणीं आईनें क्वचित औषधासाठीं मला मद्य दिलं असेल तेवढंच. एकदां मला खोकला झालेला असतांना वडिलांनीं कसला तरी अर्क गुलाबपाण्यांतून मिसळून मला प्यायला दिला होता. अफगाणाशीं युद्ध असतांना माझ्या वडिलांचा मुक्काम अटक येथें होता. या मुक्कामांत एकदां मी शिकारीसाठीं बाहेर पडलों. या शिकारीच्या धांवपळींत मी चिकार दमलों. माझ्या नोकरानीं मला सल्ला दिला कीं मी थोडंसं मद्य घेतलं तर माझा थकवा कुठच्या कुठं पळेल. तरुण वयांत कुठला पोंच रहायला—मी लगेच मद्य मागवलं. हें मद्य घेतल्यावर मला हुषारी वाटूं लागली.

त्यावेळेपासून मी नियमीतपणें मद्य घेऊं लागलों. पुढें पुढें त्याचा इतका अतिरेक झाला कीं द्राक्षासवाचा माझ्यावर कांहींच परिणाम होईनासा झाला. त्यामुळें मी पुढें दारू घ्यायला सुरवात केली. त्यांत मी एवढा प्रविण झालों कीं दिवसांतून २० कप डबलधारेची दारू मी पिऊं लागलों. या काळांत माझं जेवण म्हणजे एक कोंबडी आणि भाकऱ्या. शेवटीं याचा एवढा अतिरेक झाला कीं मला पीत असतांना माझा तोल सावरतां येईना; दुसऱ्यांनी माझा पेला हातीं धरावा आणि मी तो प्यावा.

अखेर मी हकीमाला बोलावणं पाठवलं. त्यानें सौम्य शब्दांत मला सांगितलं कीं अशा प्रकारें सहा महिनेपर्यंत मी मद्यपान केलं असतं तर माझं दुखणं हाताबाहेर गेलं असतं. त्याचा उपदेश योग्यच होता. आणि दारुपेक्षा जीव लाखमोलाचा होता. त्याच्या उपदेशाचा माझ्यावर परिणाम झाला आणि त्या दिवसापासून मी मद्यपान हळूहळू कमी केलं.

मी माझी दारू द्राक्षासवांत मिसळून घेऊं लागलों आणि शेवटीं दिवसातून सात कपावर मी भागवूं लागलों. ( जहांगीरच्या आठवणी )

*"—मीं म्हंजे एक गाढव मानूस हाय बग—" असं स्वत:लाच*
*म्हणणाऱ्या टोपा होळाराची*
*हीं करूण कहाणी——*




**व्यं क टे श   मा ड गू ळ क**

गंजून फुटलेल्या, शेतकामासाठीं निकामी झालेल्या पऱ्याच्या मोटेखाली डाललेला टोपा होलाराचा कोंबडा मघाच जागा झाला होता. त्याची पहिली दुसरी बांग झाली होती. मालक आपल्याला सोडतो कधीं आणि आपण बाहेर पडतो कधीं असें त्याला झालें होतें. बसल्या जागीच तो सारखी चुळबूळ करीत होता. त्याच्या अंगाला अंग घासून बसलेल्या दोनचार कोंबड्या डोळे न उघडतांच कुरकुरत होत्या. कोंबड्याच्या चुळबुळीचा त्यांना त्रास होत होता.

बराच वेळ वाट बघून शेवटी कोंबडा उठला आणि एकवार जोराने कोकला.

खोपटाच्या मध्यभागीं टोपा होलार कांबळ्यांत घुसमटून पडला होता. त्याच्या अंगाखालचें घोंगडें गोळा झालें होतें, टोपा भुईवरच लोळत होता. कोंबडा कोकताच टोपाची पोदुशी असलेली बायको म्हणाली,

"अवं, उठा की, पाक उजडलं, कामावर न्हाई का जायाचं ?"

बायकोचे हे शब्द कानीं येताच टोपा चटक् बाहुलीसारखा उठून बसला. एकवार डावीकडे आणि एकवार उजवीकडे अंग मुरगाळून त्यानें रात्रभर ताठलेली कंबर मोडली. धोतराचा गळाठा आवरीत म्हटलें,

"अग व्हय ग व्हय. चलपत्याच्या रानांत खांदायला जायाचं हाय. मला ध्यानच न्हाई न्हायलं !"

टोपा हें आपलं उगीच बोलला. कामाचें त्याला पक्कें ध्यान होतें. चलपत्याकडून दिवसाच्या कामाबद्दल रोख पैशाऐवजी ज्वारी घ्यायची आणि दोन दिवसाची बेगमी म्हणून बायकोच्या हवाली करायची. कामावरून येतायेताच वाण्याच्या दुकानाकडे वळायचें, कोरड्याशासाठीं कांहीं घेता आलें तर बघावयाचें असा विचार करता करताच त्याला झोप लागली होती. पहांटें जाग आली तेव्हांहि वाणी उधार देईल कां हाच विचार त्याच्या मनांत आला होता. काय करावें, कसें करावें असें घोकत तो आपला पडून राहिला होता.

अंगानें जड झालेली बायको अंथरुण दुमडून पोरीच्या अंगावर टाकीत म्हणाली,

"मग आवरा की चद्सरी. भाकरी घ्या खाऊन. टिकाव मिळतो कां बगा कुनाकडं. येळ झाल्यावर बोंबलील त्यो बाबा."

खोपटाच्या बाहेर येऊन टोपानें तोंड खंगळलें. अंगांत अंगरखा घातला आणि पटका डोक्यावर ठेवत तो खोपटाबाहेर पडला. जातां जातां, अंगणांत पालथी घातलेली पऱ्याची मोट उलथी करून त्यानें कोंबड्या सोडल्या. एक कोंबडा आणि तीन कोंबड्या घशांतल्या घशांत आवाज करत बाहेर पडल्या आणि कांहीं टिपायला गावतें का म्हणून, माना काढून भुई शोधूं लागल्या.

टिकाव हुडकीत टोपा चार घरें हिंडला. रामप्रहरांत त्याची नड कोणी



अनुक्रमणिका



## पालखी

पहाटच्या तिमिरांत दूरवर
कुठल्या देवालयीं
घंटा निनादते आहे—
त्या स्वरलहरींच्या स्कंधावर

लाल पालखी ही
कुणांची हेलावत राहे
नगराच्या मम वेशीवरती
रत्नदिव्यांच्या या

अचानक झगमगल्या माला
काळोखावर वनफुलांचे
उलगडले गालिचे
पथावर किनारल्या ज्वाला

नीरवतेच्या गहन धुक्यांतुनि
रुणझुणाऱ्या तारा
स्वरांकुर क्षितिजाला फुटले
धवलनील फुलवूनि पिसारा

व्योमनदीच्या तटीं
नाचतीं नक्षत्रांचीं दलें
आशा वैभवामधून मिरवित
दिव्य पालखी ती

येतसे माझ्या दारावरी
किनखापी पडद्यांतुनि उमले
स्वर्गशलाकेसम
सकंकण हात कुणाचा तरी !

—कुसुमाग्रज

भागवेना. 'गेना, वाईच टिकाव दे तुजा,' 'आन्नापा, नड करता का एक, तुमचा टिकाव द्या घटकाभर' असें काकुळतीनें मागत त्याला बराच वेळ हिंडावें लागलें. या मागामागीत दिवस बराच वर आला. न्याहरीची वेळ झाली.

टिकाव घेऊन टोपा धांदलीनें घरीं परत आला. तेव्हां बायकोनें त्याला शिळी भाकरी आणि चटणी दिली. ती हातावर घेऊन टोपा दोन पायावर बसला. 'चलपत्या वाजिवतोय आतां,' वेळ झाला. चलपत्या बोंबलील, असें वरचेवर म्हणत त्यानें भाकरी खाल्ली. गळ्याची घाटी हलवीत पाणी प्याला आणि मोठ्या गडबडीनें खोपट सोडलें.

दरम्यान उन्हें निबर झालीं होतीं. अंगणांत पडलेल्या मोठ्या धोंड्यावर टोपाची पोरगी अंग आखडून उन्ह घेत बसली होती. तिचा चेहरा मलूल दिसत होता. आईने हातावर दिलेली कोरभर भाकरी आणि गुळाचा तख तसाच हातात ठेवून ती आपल्या काळ्या अंगावर चपा चपा उन्ह घेत गप्प बसली होती.

अंगरख्यानें तोंड पुशीत टोपानें होलारवाडा ओलांडला. तो गांवांत शिरला आणि त्याच्या कानावर ढोलक्याचा आवाज आला. त्याची सटक्याची चाल मंदावली. देवळाकडच्या बाजूने आवाज देत होता. थेट वाटेनें गांव ओलांडून जायचें त्या ऐवजी थोडी वाकडी वाट करून देवळावरून जाऊं, काय भानगड आहे ती बघूं अशा हिशोबानें, गांवच्या पाराला मुरगळा मारून टोपा देवळाकडे आला.

देवळापुढच्या पटांगणांत चक्क उन्ह पडलें होतें. लोकांची ही गर्दी झाली होती. ढोलकें जोरजोरानें वाजत होतें. काय बरे भानगड असावी, गारुड्याचा खेळ आला काय, म्हणून टोपा पुढे झाला. गर्दीच्या कड्याशी भिडला आणि टाचा उंच करून त्यानें पाहिलें.

बाबाखान दरवेशानें वाघ आणला होता. टोकदार दाढीचा आणि झोकदार पटक्याचा बाबाखान पटांगणाच्या मध्यभागीं उभा राहूत हातातली लोखंडाची कडी खळखळवीत होता, खेकड्यासारखा तिरका तिरका सरत होता, हातांतली काठी हालवीत होता, हारळ्या दे देऊन म्हणत होता—

"हो हो रे बेटा, आहाहाहा, बेटा, तुझी हुशारी दुनियेला मादीत, ती हितं ह्या नगरीला दाखीव, सोळा हात उंच फिरन मार ऽऽऽ र् बेटा, हा हा ऽऽ आं हा."

अंगानें हाडकलेल्या वाघाला दोन्हीकडे काढण्या लावून दोघा भक्कम गड्यानीं धरले होतें. बाबाखाननें काठीने डिवंचताच वाघ काठीवर पंजा हाणी, गुर्र करी, नाकपुड्या फेंदारून जबडा फाकी. त्यानें थोडी उसळी मारताच ते दोन गडी काढण्या खेचून घेत. लोकांचे कडे मागें होई. पोरेंढोरे आपल्या थोरल्या माणसाचे हात घट्ट धरत.

एवढें मोठें जनावर पण बाबाखान त्याला अस्वलासारखें खेळवीत होता ! टोपाला नवल, नवल वाटलें. खांद्यावरचा जड टिकाव हातांत घट्ट आवळून, उघडल्या तोंडानें तो खेळ पाहूं लागला.

बाबाखानचे डोळे सुद्धां खून चढलेल्या माणसासारखे तांबडेलाल झाले होते. जनावर जसे तापलें होतें तसा तोहि तापला होता. हातांतील काठी उंच करून तो फडात पहिलवान जोड बघत हिंडावा तसा पटांगणभर हिंडत म्हणाला,







अनुक्रमणिका

" कोंबडा देता का कुणी कोंबडा. वाघाला शिकार करायला लावतो कोंबड्याची, हाय कोनी हौशी लाल. हाय कोनी रंगलाल ? "

खेळ बघण्यापुरते रंगलाल सगळे होते. कोंबडा देण्याची बात आली तेव्हां हरेकजण दुसऱ्याच्या तोंडाकडे तरी, नाहींतर इकडे तिकडे बघूं लागला. बाबाखानच्या डोळ्याला डोळा कोणी दिला नाहीं. पटांगणांत दोनचार रिंगणें झाली तरी कोंबडा देतों म्हणणारा एकजण सुद्धा पुढे येईना तेव्हां बाबाखान फार तापला, भडकून म्हणाला. " अरं काय ही तुम्हा गांवकऱ्याची दानत ! एक कोंबडं सोडवंना तुमच्या हातनं. दर साली आलों म्हंजे मी बोलताच अवकाश गांवचा पाटील बळवंतराव मला कोंबडा द्याचा. ह्यासालीं ह्या गांवांत न्हाई, परगांवीं हाय. म्हणून काय झालं ? एक पाटील सोडला तर सगळे लोक भि[illegible] ा सारखे ? एकजन न्हाई असा दाता ? पाटील काय ? "

[illegible] ㅡㄷ धरून टोपा हें सगळे इरसरीचें भाषण ऐकत [illegible] तो न राहून बोलला.

" अवं, असं कसं म्हनता. पाटील न्हाईत म्हणून कांहींच नाहीं असं कसं हुईल ? "

त्यासरशी बाबाखान पुढें आला आणि टोपाचा हात धरून त्याला पटांगणांत आणीत म्हणाला,

" शब्बास, शब्बास, पाटील नसलं तर नसलं, तुमी देता काय मालक कोंबडा ? "

टोपा बेफिकिरीनं म्हणाला,

" देऊं, अहो एक कोंबडं म्हंजे काय फार मामलत हाय काय ? "

पाठीवर थाप टाकून बाबाखान म्हणाला, ' शब्बास, शब्बास, गांवाचं नांव राखलं तुमी मालक, काय नांव तुमचं ? '

" नांवाला काय करायचं हाय तुमाला, कोंबडा आनून दिला म्हंजे झालं ! "

दरम्यान लोक बोलत बोलत टोपाभोंवती गोळा झाले होते. त्यांनी टोपाला चढव, चढव, चढवला. टोपाहि चढला. लोक म्हणाले,

" शाबास टोपा, तुज्यासारखा हौशी मानूसच अशा कामीं पुढं येतो. पळ, जा, घेऊन ये चट्शिरी कोंबडा. "

चौघापांचजणानीं सांगितलं तसा टोपा खोचा खोवून धांदलीने परत होलारवाड्याकडे आला. पोरगी अजून तशीच गप्प् बसून होती. गळ्याच्या लोळ्या हालवीत कोंबडा अंगणांत फिरत होता. बायकू काय घरांत नव्हती. टोपा हातात दाणे घेतल्यागत करून उभा राहिला. त्यानें तोंडानें ऑ ऑ ऑ करताच धुम्धुम् पळत कोंबडा आला. चपळाईनें हात चालवून टोपाने त्याला पायाला धरला, धोतराखाली झाकला आणि सटक्याने तो परत देवळापाशीं आला. दरवेशाच्या हाती कोंबडा देऊन म्हणाला,

" हां करा, काय खेळ करता ते ! "

मग टोपा तोऱ्यानें उभा राहिला आणि लोक उत्सुकतेनें पुढला प्रकार बघूं लागले.

दरवेशाने एक पोर शोधून काढलें. मोठा दोर आणून त्याला दिला. लिंबावर चढून दोराचें दुसरें टोंक फांदीवरून खालीं सोडून घेतलें. त्या टोकाला कोंबडा बांधला आणि दुसरें टोंक आपल्या हातीं ठेवलें. हातांतले टोंक ओढून, दुसऱ्या टोकाशीं लोंबकळणारा कोंबडा खालीवर करुन ट्रायल घेतली आणि वाघाला पुढें आणला. शिंक्यावर असलेल्या लोण्याकडे मांजर पाहते तसा वाघ आपल्या हिरव्या डोळ्यांनीं कोंबड्याकडे बघूं लागला. कोंबडा सारखा केंकाटत होता आणि पंख फडफडवीत होंता.

ढोलकें वाजूं लागले. पिपाणी वाजूं लागली. हातांतील कडीं खळखळवत बाबाखान ओरडूं लागला.

" ओहो रे बेटा, हा हा रे बेटा. सोळा हाताची उडी हाण. तुझं कसब नगरीला बघूं दे. "

आणि दोराचें टोक सैल सैल सोडून त्यानें कोंबडा खालीं आणला, पार वाघाच्या नाकाला भिडवला आणि चलाखीनें पुन्हां शेंदून वर घेतला. वाघ गुरगुरू लागला. त्याचें शेपूट सारखे वळवळूं लागलें.

टिप्पण साधून वाघ उडी घेई आणि लगेच बाबाखान कोंबडा शेंदून वर घेई.

ढोलकेवाला ढबा ढबा ढोलकें बडवी. पिपाणीवाला माना वेळावून लावणीची गत धाईनें वाजवी.

असें सारखें चाललें होतें. शेवटी बाबाखानला लोक म्हणाले,

" ये लेका, बाबाखान, धरू दे आता वाघाला कोंबडं, जनावर तापलंय, आतां फार लांबवू नकोस. न्हाइतर परनाम येगळा होईल. "

नगरीचें म्हणणें बाबाखानने ऐकले. कोंबडा खाली सोडला. वाघानें उंच किरण मारलें आणि फडफडणारा कोंबडा जबड्यांत धरला. काक काक, को करून कोंबडे केकाटलें आणि खेळ खल्लास झाला !

• • •

टोपा चलपत्याच्या रानांत गेला. अंगांतलें अंगरखें काढून ठेवून त्यानें हाताच्या दोन्ही तळव्यावर थुक टाकली आणि तो हरळीने कठीण झालेले रान अंगच्या नेटाने खांदू लागला. खोल गेलेल्या हरळीच्या मुळ्या वेचून बाजूला टाकूं लागला.

संध्याकाळचे पांच वाजेपर्यंत टोपाने फका फका रान खांदले. त्याचें कंबरडें, आणि हाताचे रट्टे भरून आले. पोटांतले अन्न पार भस्म होऊन गेलें. तोंडाला कोरड पडली आणि घामाने अंग थबथबले. काळी माती सगळ्या अंगभर डसून बसली.

संध्याकाळ झाली. पांखरें गोंधळ करूं लागलीं तेव्हां टोपाने काम पुरें केलें. अंगरखा आणि टिकाव खांद्यावर टाकून उघड्या अंगानेच तो ओढ्याला गेला. वहात्या धारेत त्याने हातपाय तोंड धुतले. कानांत,

मंदाचा स्वातंत्र्यदिन — १



' सायलेन्सझोन '





पऱ्यांच्या बोटामध्ये बसलेली माती काढली आणि दुखरें अंग घेऊन तो गांवाकडे आला. चलपत्याच्या घरीं आला. पायरीशीं बसून म्हणाला,

" आजचा रोजगार द्या जी. "

चलपत्याला उगीचच राग आला. तो म्हणाला, " टोप्या, मी काय कुटं जात हुतो व्हयरं. पठाणावाणी लगीच दारात आलास ते ! " टोपा गयावया करून म्हणाला,

" न्हाई मालक. घरांत कायसुदीक न्हाई. तुमच्यातलं दानं न्हेउन दळू तवा भाकरी मिळंल. " चलपत्या म्हणाला,

" ही तुमा लोकांची बोंब रोजचीच हाय्. अजून चार रोजाचं काम हाय, ते पुरं कर आन् रोजगाराची जवारी घिउन जा. "

" नगा, जी. पोटाला काय न्हाई आज. पाठीवर मारा पर पोटावर नगा मारूं. "

" बरं, सकाळीं ये. आत्ता पोतं फोडल्यालं न्हाई. "

" नगा जी, असं करूं. "

रात्र होऊन चांगला अंधार पडेपर्यंत टोपाला चलपत्यानें घोळसला. टोपानें त्याच्या मिनत्या, मिनत्या केल्या. शेवटी शिव्या देत चलपत्या उठला आणि आडशिरीभर जोंधळे त्यानें टोपाच्या पदरांत ओतले.

धोतराच्या खोच्यात घेतलेले जोंधळे एका हातात, खांद्यावरचा टिकाव दुसऱ्या हातानें संभाळीत टोपा होलारवाड्यांत आला.

अंगणांत त्याला पोरगी दिसली नाहीं. खोपटांत शिरून तो बोलला.

" कुटं गेली धुर्पी, हां, आन् काय तरी हे वतायला. दळ थोडं, आन भाकरी कर. मला भुका लागल्यात. "

आणि त्याच्या ध्यानांत आले की पोरगी झोपली आहे आणि खिन्न चेहरा करून आपली बायको तिच्या उशाशी बसून राहिली आहे.

" काय ग झालं ? "

बायकोनं तोंडाला लावलेला पदर काढला. नाक पुसलें आणि रडक्या आवाजांत ती म्हणाली.

" दोपारपसनं पोरीला ताप भरलाय. अगदी सुध गेल्यावानी पडलीय, का करावं ह्या भोगाला ! "

हे ऐकताच टोपाच्या पायातलें बळच गेलें. खोच्यातले जोंधळे त्याने भुईवर ओतले आणि पोरीपाशी जाऊन तिच्या तोंडापाशी तोंड नेऊन तो म्हणाला,

" काय, हुतंय माज्या बयेला ? धुर्पा, हकडं बग सोने. "

पोरीने डोळे उघडले आणि मिटले. तिचा चेहरा तांबडा लाल झाला होता. श्वास जोरा जोराने चालू होता. अंगावरचे पांघरूणसुद्धा तापलें होतें.

असा एकाएकी ताप येऊन टोपाची पहिली दोन मुलें चांगली कळती होऊन गेली होती.

बायकोने डबडबलेले डोळे पुसले.

" रामा म्हाराच्या बायकून बघितला मगाशीं. ती म्हनाली—कोंबडा कापा तीन रस्त्यावर...गून येतोय मी म्हनते, करावं बगून "

टोपा हताशपणे म्हणाला,

" आतां कुटला ग कोंबडा आनावा ? "

" हाय आपला घरचा एक त्यो कापावा. पोरीच्या जिवापक्षी कोंबडं लई हाय कां ? "

" न्हाई खरं, पर आपला कोंबडा हाय कुटं. मी सकाळींच दिला ! "

" कुनाला ? इकला काय ? "

" न्हाई, त्यो एक गाढवपनाच झाला. बरं बस तूं. मी घिवून येतू कोंबडा. "

रात्री अंधारचा टोपा बाहेर पडला. चलपत्याकडे जाऊन त्यानें कोंबड्याची मागणी केली,

" दादा, एक कोंबडा पायजे हुता हो. "

" का रं, कोन पावना आलाय ? "

" पावना न्हाई, पावन्याला कोंबड्याचं जेवान द्याला आपन कुटं झागिरदार लागून गेलोय. पोरगी बेजान पडलीया तापानं. उतरून टाकायचा हाय. "

" किती अब्रु असावी रं टोप्या तुला. भडव्या, हुता त्यो कोंबडा सकाळीं दरवश्याला दिलास. गांवकऱ्याचा अपमान केलास. पाटलाची बरुबरी करावी वाटतीय तुला. असा रंगलाल गडी तूं, आन आता कोंबडा मागायला आलायस, तुला लाथा का बरं घालू नेत ? "

टोपा मुकाट्याने उठला आणि दुसऱ्या घरीं गेला. पण त्याची नड कोणी केली नाहीं. सगळ्यांनी त्याला शिव्याच घातल्या. त्याची लाज अब्रु काढली. तुम्ही होलार लोक फार माजला आहात असे सुनावलें.

वेड्यासारखा होऊन टोपा हातापाया पडला. पण एकाने सुद्धा त्याला कोंबडा दिला नाहीं. रात्रीं उशीरापर्यंत घरं पुजून तो रिकाम्या हाताने माघारी आला.

भुईवर ओतलेले जोंधळे तसेच पडलेले होते. बायको पोरीच्या उशाशी बसून होती. तिने आल्या आल्या टोपाला विचारलें,

" आनला कां कोंबडा ? "

टोपा अंधाऱ्या कोपऱ्यांत दोन पायावर बसला. दोन्ही हाताची मिठी त्याने गुढग्याला घातली, भरल्या आवाजांत तो म्हणाला,

" मीं म्हंजे एक गाढव मानूस हाय बग " आणि त्याने मान खाली घातली.

• •



## बाळवाटी :

चोंच आहे तेथे
दाणाहि असावा
होऊं नये धांवा अर्थशून्य
संतांच्या ताटांत
माझी बाळवाटी
माझी माझ्यासाठी असों द्यावी

— मधुकर केचे

—येथें कापा **शब्दरंजन स्पर्धा क्र. ९ ची प्रवेशपत्रिका** येथें कापा—

**बक्षिसें रु. १०,०००]** पत्ता : शब्दरंजन स्पर्धा क्र. ९ [अखेरची ता. १३-३-५९

कामा हाऊस, [ फ्री प्रेस, समोर ] दलाल स्ट्रीट, मुंबई १.

**ही प्रवेशपत्रिका जशीच्या तशी आणि फक्त एकाच स्पर्धकाच्या नांवानें पाठविली पाहिजे. न पाठविलेले चौकोन फुली मारून रद्द केले पाहिजेत.**

**प्रवेश-फी प्रत्येक चौकोनास पन्नास नये पैसे आहे. संपूर्ण प्रवेश-फी दोन रुपये.**

| प्रवेश-फी फक्त ५० नये पैसे | |
|---|---|
| १ खरें | बरें |
| २ कृपाळू | कष्टाळू |
| ३ अडचणी | अडसर |
| ४ सद्विचार | सदाचार |
| ५ पुरुषांना | पुष्कळांना |
| ६ पशूंना | शिशूंना |
| ७ कंपूचे | टापूचे |
| ८ अज्ञेय | अजेय |
| ९ खचतें | वाढतें |
| १० खोट्या | मोठ्या |
| ११ धर्मांची | धंद्यांची |
| १२ विनय | उद्यम |
| १३ नित्य | सत्य |
| शब्दरंजन स्पर्धा क्र. ९ | |

चौकोन क्र.

| प्रवेश-फी फक्त ५० नये पैसे | |
|---|---|
| १ खरें | बरें |
| २ कृपाळू | कष्टाळू |
| ३ अडचणी | अडसर |
| ४ सद्विचार | सदाचार |
| ५ पुरुषांना | पुष्कळांना |
| ६ पशूंना | शिशूंना |
| ७ कंपूचे | टापूचे |
| ८ अज्ञेय | अजेय |
| ९ खचतें | वाढतें |
| १० खोट्या | मोठ्या |
| ११ धर्मांची | धंद्यांची |
| १२ विनय | उद्यम |
| १३ नित्य | सत्य |
| शब्दरंजन स्पर्धा क्र. ९ | |

चौकोन क्र.

| प्रवेश-फी फक्त ५० नये पैसे | |
|---|---|
| १ खरें | बरें |
| २ कृपाळू | कष्टाळू |
| ३ अडचणी | अडसर |
| ४ सद्विचार | सदाचार |
| ५ पुरुषांना | पुष्कळांना |
| ६ पशूंना | शिशूंना |
| ७ कंपूचे | टापूचे |
| ८ अज्ञेय | अजेय |
| ९ खचतें | वाढतें |
| १० खोट्या | मोठ्या |
| ११ धर्मांची | धंद्यांची |
| १२ विनय | उद्यम |
| १३ नित्य | सत्य |
| शब्दरंजन स्पर्धा क्र. ९ | |

चौकोन क्र.

| प्रवेश-फी फक्त ५० नये पैसे | |
|---|---|
| १ खरें | बरें |
| २ कृपाळू | कष्टाळू |
| ३ अडचणी | अडसर |
| ४ सद्विचार | सदाचार |
| ५ पुरुषांना | पुष्कळांना |
| ६ पशूंना | शिशूंना |
| ७ कंपूचे | टापूचे |
| ८ अज्ञेय | अजेय |
| ९ खचतें | वाढतें |
| १० खोट्या | मोठ्या |
| ११ धर्मांची | धंद्यांची |
| १२ विनय | उद्यम |
| १३ नित्य | सत्य |
| शब्दरंजन स्पर्धा क्र. ९ | |

चौकोन क्र.

या स्पर्धेत भाग घेतांना मी असें कबूल करतों कीं या स्पर्धेचे नियम व अटी मला मान्य असून बंधनकारक आहेत. स्पर्धा-संपादकांचा अखेरचा निर्णय मी मान्य करीन व तो कायदेशीर आहे, असें समजेन.

सोबत जोडलेली
मनीऑर्डरची पावती...क्र..............
पोस्टल ऑर्डर...क्र..............
शब्दरंजन रोखीची पावती क्र..............
पाठविलेली एकूण प्रवेश फी रु. न.पैसे

क्र. ९ | पूर्ण नांव : श्री.-सौ. कुमार/कुमारी ____________
पत्ता ____________

येथें कापा

## अखेरची तारीख

: स्थानिक :
१२ मार्च १९५९
: पोष्टानें :
१३ मार्च १९५९
: अधिकृत उत्तर :
दै. लोकमित्र रविवार
१५-३-१९५९

### विधानें

[१] गृहिणीपद कठिण खरें/बरें

[२] नायका या शरीरानें नाज़ मनानें कोमल, अंतःकरणानें मृदु स्वभावानें मोठ्या प्रेमळ व कृपाळू/कष्टाळू असतात.

[३] धर्म हा व्यवहारांत अडचणी/अडसर घालण्याकरितां निर्माण झ नाहीं.

[४] सेवाधर्मांचें सद्विचार/सदाचार व शुद्ध चारित्र्य हें एक आहे.

[५] पुरुषांना / पुष्कळांना खट्याळ मैत्रीण आवडते, पण खट्य बायको चालत नाहीं.

[६] पोटांत क्रोधाचा भडका ... असतां बाहेर हंसण्याची कला पशूंना/शिशूंना मुळींच साधत नाहीं.

[७] स्थानिक वर्तमानपत्रें आप कंपूचे/टापूचे मत व्यक्त करतात.

[८] जगांत अज्ञेय/अजेय, दु आणि दुर्गम असें काय आहे ?

[९] निःशस्त्र माणसाचें खचतें/वाढतें.

[१०] धनलोभी मनुष्य श्रीमंता खोट्या/मोठ्या नम्रतेनेंच वागतो.

[११] कांहीं कांहीं धर्मांची/धंद्यांची मद्यासारखी निशा च असली पाहिजे खास !

[१२] 'विद्या विनयेन शोभ हें वचन सुशिक्षितांनीं खरें कर दाखविलें पाहिजे. शिक्षणानें मनु विनय/उद्यम शील बनला पाहिजे

[१३] सृष्टिनियम नित्य/स







माचे महिन्यांत केशवसुतांचा जन्म झाला आणि मराठी कवितेच्या इतिहासांत नव्या युगाचा जन्म झाला जणूं ! आजकाल युगप्रवर्तक हा मान मिळविणें प्रसिद्धीची साधनें वाढल्यामुळें फार सुलभ झालें आहे. पण १८८५ ते १९०६ च्या काळांत मराठींत मासिकांची संख्या हुन तिन साडे तीन. पण तशांतहि केशवसुत महाराष्ट्ररसिकांचे आणि समकालीन कवींचे प्यार बनले. वयाच्या ३९ व्या वर्षी त्यांचें झालेलें निधन म्हणजे मराठी कवितेवरचा दारुण आघातच. अनेक मराठी अंतःकरणें त्यामुळें विव्हल झालीं. ' मासिक मनोरंजन ' नें त्या दुःखदप्रसंगी जें अश्रुविमोचन केलें तें आजहि दीपावलीच्या वाचकांना परत परत वाचावेसें वाटेल—जुन्यांतलें हें सोनेंच !




# के श व सु त

**जन्म**
फाल्गुन वद्य १४, शके १७८७
ता. १५ मार्च, सन १८६६

**मृत्यु**
कार्तिक शुद्ध १४, शके१८२९
ता. ७ नोव्हेंबर सन १९०५

अर्वाचीन कवींत कोण गगनीं
मारी भरारी वरी ?
राष्ट्रा जागृति आणण्यास कविता
जागी कुणाची पुरी ?
आहे तो कवि तूंच केशवसुता !
बाकी वदाया कवी !
हा ! हा ! कां कविता परी तव
अशी गुलदस्त ती राहवी !

*' कोणीतरी '*

महाराष्ट्र वाङ्मयाशीं परिचय असणाऱ्या रसिक मंडळीस ' केशवसुत ' हे एक आधुनिक कवि होते, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. गेल्या अंकांत ' केशवसुतांच्या ' आकस्मिक निधनाचें दुःखद वृत्त कळविण्याचा आम्हांवर प्रसंग आला. त्यांच्या निधनवार्तेनें आमचा जो हृदयभेद झाला, तो शब्दानीं रेखतां येणें कठीण ! **मनोरंजनाशी केशवसुतांचा** आज आठ दहा वर्षें संबंध होता. ह्या अवधींत मनोरंजनांतून त्यांच्या कविता कांहीं निनांवी, कांहीं ' एक मित्र ' ' कुणीतरी ' व ' केशवसुत ' या नांवाखालीं प्रसिद्ध झाल्या आहेत.

स्वभावानें कृष्णाजीपंत हे फार निस्पृही, बाणेदार व करारी होते. वरिष्ठांशीं हांजी हांजी करणें त्यांना बिलकुल आवडत नसे. त्यांची वागणूक नेहमींच सरळ असल्याकारणानें जगांतील डावपेचांच्या वागणुकीशीं त्यांचें कधींच जुळत नसे. ते अत्यंत सुशील असून निर्व्यसनी होते. जेथें परिचय नाहीं तेथें त्यांची संकोचवृत्ति निदर्शनास येत असे. त्यांचा प्रेमळपणा ' नैऋत्यदिशेकडील वारा ' या त्यांच्या कवितेवरून व्यक्त होतो व त्याचा अनुभव त्यांच्याशीं गाढ परिचित असणाऱ्या मित्रांसच लाभला असेल. शिक्षक या नात्यानें त्यांचा लौकिक चांगला होता. सरस्वतीचें व लक्ष्मीचें नेहमीं वाकडें असावयाचें, तदनुसार त्यांचें सर्व आयुष्य दारिद्र्यांतच गेलें. एकेवेळीं त्यांचा पगार थोडा असल्यामुळें त्यांना पैशाची नड पडूं नये म्हणून त्यांचे धाकटे बंधु मोरोपंत यांनी त्यांना मनीऑर्डर करून कांहीं रकम पाठविली. परंतु ती मनीऑर्डर कृष्णाजीपंतांनीं परत केली, या एकाच गोष्टीवरून त्यांच्या ठिकाणीं असणारी स्वावलंबनवृत्ति किती जागरूक होती हें स्पष्ट होतें. त्यांचें विचारस्वातंत्र्य विलक्षण होतें, व तें त्यांच्या वर्तनांत नेहमीं व्यक्त होत असे. ते बोलण्यांत फार निर्भीड असत. आपणांस जें खरें वाटेल तें उघड उघड बोलण्यांत त्यांनीं कधीं कोणाची पर्वा केली नाहीं. ते फार निश्चयी व कुशाग्रबुद्धीचे होते.

मराठी शिकत असतां पोथ्या वगैरे वाचण्याचा कृष्णाजीपंतांस नाद होता. त्यांचे








अनुक्रमणिका

वडील बंधू कै. श्रीधरपंत हे कॉलेजला सुटी झाली म्हणजे घरीं येत. त्यांना कविता करण्याचा नाद असे. त्यांच्या सहवासानें कविता विरचनाची प्रथम यांस गोडी लागली. पुढें बडोद्यांत ते प्रोफेसर झाल्यावर त्यांच्या सान्निध्यांत हे एक वर्षभर होते, तेव्हां कवितेची अभिरुची जास्त वाढली. इ. स. १८८३ सालच्या जून, जुलै व ऑगस्ट या महिन्यांत ते नागपूरास आपल्या मामाकडे गेले होते. तेथें आधुनिक कवींतील अग्रणी रा. रा. नारायण वामन टिळक यांच्याशीं सहवास घडून आला. याचवेळीं कृष्णाजीपंतांच्या ठिकाणीं कवित्वस्फूर्तीची झांक स्पष्टपणें दिसूं लागली. पुढें पुण्यास आल्यावर शाळेंत असतांना त्यांनी कित्येक कविता रचल्या. पुण्यांतील '**पर्वता**' वर कांहीं कविता रचल्याचें व त्याचप्रमाणें इतर स्फुट विषयांवरही कित्येक लिहिल्याचें त्यांच्या समकालीन मित्रमंडळीच्या सांगण्यावरून कळतें. आंग्ल कवींशीं परिचय झाल्यावर तर त्या स्फूर्तीस विशेष स्वरूप येऊं लागलें व पुढें पुढें ते काव्यांत पूर्णपणें रंगून गेले. त्यांच्या तकी सबाह्यांतर काव्य विषयांत रंगून लेली चित्तवृत्ति क्वचितच आढळेल. ध्यानीं, नीं, स्वप्नीं कवितेवांचून अन्य विषय त्यांस ाहीत नव्हता इतकी त्यांची कवितेशीं तल्लीन त्ती झाली होती. कवितेची आराधना करयांतच त्यानीं आपलें आयुष्य घालविलें असें हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं असें ाटतें. त्यांच्या आवडीचे आंग्ल कवि म्हटले णजे एमर्सन, शेले, कीटस व वर्डस्वर्थ हे ात. महाराष्ट्र कविपैकीं तुकाराम त्यांस फार ावडे. तरीपण त्यांचा पुष्कळसा भर इंग्रजी वींचीं काव्यें वाचण्याकडे असे. शेले कवीप्रमाणें कल्पना सृष्टींत संचार करण्यांत ते दंग होतेंसें दिसतें. कवीनें शब्दांबरोबर न वाहवतां कल्पनेशीं झगडलें पाहिजे; नुसत्या शब्दांच्या थाटामाटानें कविता होत नसते. शब्दांत काव्य नाहीं तें सर्व कल्पनेंत आहे; असे त्यांचें ठाम मत होतें. कवितेचें बाह्यरूप कसेंही असलें तरी हरकत नाहीं;पण तिचें अंतरंग उदात्त कल्पनांनीं व विचारांनीं—तात्विक विचारानीं—भरलेलें पाहिजे, तरच तिचें खरें उज्वल स्वरूप प्रकट होईल, एरवीं नाहीं; केवळ यमक, प्रास आणि अलंकार यानीं नटविलेली कविता खरी कविता नव्हे, असें ते म्हणत असत. त्याचप्रमाणें कवितांच्या चालीसंबंधानें त्यांचें असें म्हणणें असें कीं लोकांना चाल समजेल कीं नाहीं याची कवीला पर्वा करण्याचें कारण नाहीं. काव्याचा विषय आणि स्फूर्ति ज्या चालींत कवीकडून गुणगुण करवील, तीच त्याच्या कवितेची चाल. कवीनें स्वच्छंदानें येईल तशी कविता रचावी. जो सहृदय असेल तोच ती समजावून घेईल. कविता मोजक्या शब्दांत असून अर्थप्रचुर असावी, असा त्यांचा कटाक्ष असे व तदनुसारच त्यांची कविता असल्याचें आढळून येतें. काव्य व चित्रकला यांमधील निकटसंबंध व साधर्म्य त्यांचे ठिकाणीं बीजांकुरानें वसत असल्याचें स्पष्ट दिसतें. न्यू इंग्लीश स्कूलमध्यें असतांना ते आपल्या वहींत—अभ्यासाकडे दुर्लक्ष करूनही—केव्हां केव्हां आपल्या गुरूंचीं—टिळक व आगरकर यांचीं—चित्रें रेखाटीत व तीं ओळख पटण्याजोगीं निघत. एक वेळ असा योग आला कीं आगरकरांस आपल्या विद्यार्थ्यानें काढिलेलें आपलेंच चित्र पाहण्यास मिळालें. त्यांना त्या गोष्टीचें मोठें कौतुक वाटलें. परंतु त्यावेळीं हा आपला विद्यार्थी पुढें चांगला कवि निपजणार याची त्यांना कल्पनाही नव्हती ! नाहींतर त्यांच्या लेखणींतून 'काव्य व चित्रकला' या विषयावर एखादा मजेदार लेखहि बाहेर पडता ! विद्यार्थीदशेंत असतांना एकदां "असा दुर्मुखल्यासारखा काय बसतोस ? तुझ्या तोंडावरची माशीही कधीं हलायची नाहीं ?" असे उद्गार शिक्षकांकडून निघाले होते. याला उत्तरादाखल 'दुर्मुखलेला विद्यार्थी' म्हणून केशवसुतांनीं एक कविता लिहिली. त्यांत त्यानीं खालील आशयाची दर्पोक्ति प्रकट केली होती, "याच दुर्मुखलेल्या तोंडांतून अशा प्रतिभायुक्त काव्याचें निस्यंदन होईल कीं, त्या काव्याचे पाठ तुम्हांस, तुमच्या मुलाबाळांस शिकवावे लागतील." ही जगन्नाथरायाची-दर्पोक्ति प्रत्यक्ष अनुभवास येण्याचा काळ अद्याप यावयाचा आहे, व तो एकदोन पिढ्यांत येईलहि.

केशवसुतांच्या कविता प्रथम 'करमणुकींत' प्रसिद्ध होऊं लागल्या. पुढें त्या 'सुधारक' 'मासिक मनोरंजन' 'सुविचार समागम' व 'काव्य रत्नावलि' यांतून बाहेर पडत. त्यांच्या कविता एकत्र करून स्वतंत्रपणें छापून प्रसिद्ध कराव्यात, असा त्यांच्या कांहीं मित्रांचा हेतू होता, व त्याप्रमाणें आमचे मित्र श्रीयुत नारायण वामन टिळक यांनीं प्रयत्नही चालविला होता. मध्यंतरी आधुनिक कवींच्या कविता एकवटून छापण्यासंबंधानें प. वा. श्रीयुत घाटे यांचा बेत होता. परंतु दुर्दैवानें ते अकालीं निवर्तल्यामुळें तें काम अर्धवटच राहिलें. 'आधुनिक कवी'चा पूर्वार्ध बडोद्याच्या ग्रंथप्रकाशक मंडळींनें प्रसिद्ध केला आहे, व दुसरा भाग लौकरच प्रसिद्ध होईल असा भरंवसा आहे. यांत केशवसुतांच्या कविता प्रमुखत्वानें येतील, अशी आम्हांस आशा आहे. असें जरी आहे तरी त्यांच्या बहुतेक निवडक कविता एकवटून स्वतंत्र रीतीनें प्रसिद्ध करणें आतां जरूर झालें आहे.

वंगदेशीय कवि मधुसूदन दत्त यांनी वंगवाङ्मयांत इंग्रजी सॉनेटच्या धर्तीवर चथुर्दशपदी

कविता रचून जशी प्रथम प्रचारांत आणली, तशी केशवसुतांनीं ती महाराष्ट्र वाङ्मयांत आणली आहे. त्यांच्या समग्र कविता एकत्र प्रसिद्ध झाल्याशिवाय तिच्या संबंधानें विस्तृतपणें कांहीं विचार प्रदर्शित करणें योग्य होणार नाहीं, हें उघड आहे. तरीपण आम्हांला येथें इतकें विधान करितां येईल कीं, वर आम्हीं त्यांचा जो स्वभाव दिला आहे त्याचें प्रतिबिंब त्यांच्या बहुतेक कवितेंत पूर्णत्वानें पहावयास मिळतें. केशवसूत हे निसर्गतः कवि होते, हें त्यांची कोणतीहि एखादी कविता वाचून पाहिली तरी देखील आढळून येईल. उत्तम कवीस लागणारे बहुतेक गुण सदयता, सहृदयता, प्रेमळता, शुद्धता, पावित्र्य, तन्मयवृत्ति, उन्नत विचार, उदात्त कल्पना, गंभीर व उत्साही मनोवृत्ति—त्यांच्या ठिकाणीं दिसत होते. त्यांचा भव्य ललाटप्रदेश व क्वचित्प्रसंगीं त्यावर दिसणाऱ्या रेषा ज्यानीं पाहिल्या असतील त्यांना त्यांच्या गंभीर मनोवृत्तीची व तात्विक विचारांत गढून गेलेल्या मुखश्रीची स्मृति झाल्याशिवाय रहाणार नाहीं. त्यांचा फोटो काढलेला नसल्यामुळें तो आजच्या अंकांत देण्याचा आमचा अत्यंत हेतू असूनहि आम्हांस त्यासंबंधानें अगदीं निराश व्हावें लागत आहे. केशवसुतांच्या सर्वच कविता स्फुट आहेत. एखादा मोठा विषय घेऊन त्यावर स्वतंत्रपणें विस्तृतशी काव्यरचना त्यानीं केली नाहीं. तसें एखादें काव्य लिहावें असें त्यांस फार वाटे. परंतु परिस्थितीमुळें आणि काव्यविरचनास लागणारें मनाचें स्वास्थ्य न मिळाल्यामुळें त्यांच्याकडून ती गोष्ट झाली नाहीं. त्यानीं कवितांशिवाय एक नाटक व एक कादंबरी—मग ती पूर्ण असो वा अपूर्ण असो—लिहिल्याचें एकदां आमच्याजवळ प्रदर्शित केलें होतें. आम्ही कोण ? व कवितेचें प्रयोजन, या दोनच कवितांवरून ते कवि या नात्यानें आपलें कर्तव्य किती पूर्णपणें जाणत होते हें स्पष्ट दिसतें.

काव्यासंबंधानें ‘ केशवसुत ’ यांचें त्यांच्या विशेष परिचयाच्या मित्रांशीं भिन्न-भिन्न प्रसंगीं बोलणें पत्रव्यवहार होई. पुढील एकदोन उताऱ्यांवरून त्यांचे या बाबतींत काय विचार होते याची कल्पना येईल. “ पण लक्ष्यांत कोण घेतो ? ” ज्या कल्पांस अनुलक्षून लिहिलेली त्यांची कविता तर प्रसिद्धच आहे.

“ As to the idea of an annual gathering of poets:—Practical men meet periodically for pratical purposes. Poets as dreamers should sit aloof, listening to the ethereal voice of silence and trying to render it into their uncouth vernaculars, whenever the muse favours them. Some two or three congenial spirits may at times come together to sip the rainbow drops of the nectar; but more would certainly spoil its flavour. That is my idea. ”

\+ \+ \+

“ You complained काय करूं आणि काय नाहीं, असें होतें ! ” I give below an extract from Emerson's essay on ‘ The transcendentalist, ’ that struck me an apt illustration of your mood:—

“ Now we confess, and by no means happy, is our condition; if you want the aid of our labour, we ourselves stand in greater want of the labour. We are miserable with inaction. We perish of rust and rest but we do not like your work. ” “ Then says the world, show me your own ’—we have none—‘ what will you do then ? ’ cries the world. ‘ we will wait—’ ‘ How long ? ’—‘ until the universe beckons and calls us to work—’ ‘ But whilst you wait, you grow old and useless ’—‘ Be it so. I can sit in a corner and perish ( as you call it ) but I will not move until I have the highest command ’

‘ माधवानुज ’ s eldest brother once said to me, that our highest poetry was in sitting still and sheding tears !—How parallel with the above from Emerson. ’

\+ \+ \+

केशवसुतांच्या मनांतून एखादी long poem लिहिण्याचें फार होतें. एका पत्रांत त्यांनी लिहिलें होतेः—

“ Please tell + + + that I request him to undertake a long poem and not to waste time in writing short poems only. A century has passed without producing a long Marathi poem worth the name; and it is for the genuses like......and Mr........ to wipe out the disgrace. I am sorry I am a dwarf and don't show any signs as yet of out-growing. I therefore hate myself and don't like others who attempt only small things. ”

हरपलें श्रेय या आपल्या कवितेविषयी त्यांनी लिहिलें आहे :—

“ You can guess my state of mind from my piece in the last issue of Manoranjan. A crack in the heart But, alas where is the restorative ?

ईश्वराच्या अस्तित्वावर त्यांचा फार भरंवसा असल्याचें दिसत नाहीं. याविषयीं एक चमत्कारिक प्रसंगही घडून आला होता; परं त्याचा इथें उल्लेख करणें प्रशस्त नसे त्यांच्याशीं ईश्वरासंबंधानें बोलूं लागलें म्हणजे “ देव कोठें आहे तो मला दाखवा. ” असे उद्‌गार काढीत. आयुष्यक्रमांतील खडतर प्रसंगांमुळें असो अथवा त्यांच्या तात्त्विक विचारसरणीच्या मनोरचनेमुळें असो, त्यांचे अशा प्रकारचें मत झालें होतें. हें मत अलिकडे अलिकडे एकदोन वर्षांत किंचित् बदलले असावें असें दिसतें. कारण ते अलिकडे आपल्या पत्राचे आरंभीं ‘ श्रीराम ’ नाम लिहीत असत. ज्या मंजुळ नादश्रवणानुभवाचा उल्लेख बऱ्याच भगवत्भक्तांकडून जागजागी झाल्याचा आढळतो व शेक्सपीअरनेंही ज्याचा



गडकऱ्यांचें काव्य अनुभूतिशून्य आहे.

आपल्या पेरिक्लिज नाटकांत एकीकडे उल्लेख केला आहे, त्याच दिव्य आणि मधुर नादाचा अनुभव केशवसुतांस होत असल्याचें त्यांचेच तोंडानें एकदां बाहेर पडलें व त्यावर त्यांच्या एका कवि मित्रानें त्यांस सांगितलें कीं " ज्यीअर्थी हा नाद तुम्हांस ऐकूं येऊं लागला आहे त्याअर्थी हाच नाद तुम्हांस तुकारामादि साधुसंतांप्रमाणें एक दिवस साधू बनवून परमेश्वराचा नाद लावील." यावर त्यांचें उत्तर एवढेंच होतें कीं "मग माझी जशी कवितेवर आसक्ति झाली आहे तशीच त्याच्या ठिकाणींही जडेल."

मनोरंजनच्या कवि मित्रांनीं पाठविलेल्या पत्रांत केशवसुतांविषयीं पुढील उद्गार आहेतः-

"...रा. कृष्णाजी केशव दामले यांच्या निधनाचें वर्तमान आपल्या पत्रावरून समजलें. फार वाईट वाटतें. माझ्यामतें आपल्यांतला वर्डस्वर्थ गेला !"

२९-११-०५ **"टिळक"**

"...मला आपल्याला व इतर लेखकवर्गाला विशेषतः काव्यभक्तांना केशवसुताचे आकस्मिक निधनामुळें किती दुःख होईल याची कल्पना होणार नाहीं !"

२-१२-०५ **"किरात"**

"...मनोरंजनाचा डिसेंबरचा अंक आला व त्याचें पहिलें पान उघडून पाहतांच काळ्या रेघांची चौकट दिसली. काय आहे म्हणून पाहिलें तों केशवसुतांचा मृत्यु ! शिवशिव ! अर्वाचीन कवींपैकीं एक चांगला कवि काळानें गिळंकृत केला ! फार वाईट झालें !"

३-१२-०५ **'चंद्रशेखर'**

"...मनोरंजनाचा अंक आजच पोंचला त्यांतील केशवसुत कवीची निधनवार्ता वाचून मनास फारच वाईट वाटलें. मराठी भाषेंत असा कवि होणें दुरापास्त दिसतें !"

३-१२-०५—**काव्यरत्नावलि कर्ते.**

"...केशवसुताच्या निधनाची अत्यंत भयंकर वार्ता ऐकून महाराष्ट्रांतील प्रत्येक रसिक हळहळेल, यांत शंका नाहीं. मराठी अर्वाचीन कवींत त्यांची जागा भरून येण्यास कितीतरी वर्षें लागतील. त्यांच्यासारखी उंच भरारी मारणारा कवि क्वचितच सांपडेल. आज आमच्या महाराष्ट्राचा Keats गेला !"

३-१२-०५ **नरहर शंकर रहाळकर.**

"...केशवसुतांची रहाणी साधी, वर्तन पवित्र, विचार काव्यमय व भाषाशैली मनोवेधक होती...तो बोलतांना नेहमीं खाली पाहून बोले; तथापि केव्हां केव्हां तो मान वर करून पाही; तेव्हां त्याचे पाणीदार—हें पाणी खरोखरीच अलौकिक होतें–डोळे श्रोत्यांच्या हृदयाचा वेध घेऊन टाकीत." ४-१२-०५ **"विनायक"**

कृष्णाजीपंतांचे धाकटे बंधु प्रो. मोरोपंत व सीतारामपंत हे महाराष्ट्र वाङ्मयाचे भक्त आहेत. एकंदर सर्व बंधू एकसारखे बुद्धिमान असल्याचें दिसतें. अशी स्थिति असण्यास ईश्वरी कृपाच लागते. असा आपला बंधु आकस्मित व अकालींच निवर्तल्याबद्दल त्यांना परम दुःख झालें असेल; त्यांचें सांत्वन करणें **मनोरंजन**च्या शक्तीच्या बाहेरचें आहे. एवढें सांगून, आमच्या परमप्रिय कविमित्राची मूर्ति प्रेमभरानें अंतर्यामीं पुनः एकवार आठवून त्यांचें अल्पसें जीवनचरित्र येथें पुरें करितों. त्यांच्या अविनाशी आत्म्यास परमेश्वर आपल्या सन्निध अखंड स्वानंदसुखांत ठेवो, इतकीच त्याजवळ प्रार्थना आहे.

ॐ शांतिः शांतिः शांतिः

# जत्रेंतील चित्रें

ग. दि. माडगूळकर

*' मनीं आणावें तें तें होतें*
*दु:ख अवघेंचि विरोनी जाते*
*कृपा केलिया रघुनाथें*
*प्रचीति येते. '*

दिवसांतून दहा वेळां तरी शाहीर या ओळी ठांसून म्हणतो. ' प्रचीति येते ' हे शब्द त्याच्या तोंडून ऐकतांना तर, ऐकणाराची खात्री होऊन जाते कीं, शाहीरानें ती प्रचीति अनेकदां अनुभवली असली पाहिजे.

शाहीर आतां चाळिशींत आला आहे. एवढ्यांतच त्याच्या तोंडांतील दंताजीचे ठाणें ' उठलें आहे. तुरळक कांहीं अस्थिर पहारेकरी उरले आहेत पण ते नुसते राखणे. त्यांच्या डोक्यावरचे केस विरळ झाले आहेत, पिकले आहेत. डोळे तर लहानपणापासूनच अधू आहेत. त्यांचीं बुबळें सारखी जागच्या जागीं ' लकलक ' हलत असतात. आपल्या चरणांवर एकाग्रतेनें स्थिर व्हावी अशी नजर देखील त्याला रघुनाथानें दिलेली नाहीं. अंगयष्टि म्हणाल तर तीहि ठेंगणी. कान विचित्र. त्याच्या कानांना, वरच्या बाजूला असते ती मुडपण मुळांतच नाहीं. नाहीं म्हणायला देवानं त्याला एकच गोष्ट दिली आहे. मिठास वाणी. त्याचें बोलणें अतिशय गोड. ऐकणारा ऐकतच राहतो. आपल्या मुलखांत कथा निवेदकाचा व्यवसाय रूढ नाहीं, नाहींतर शाहीराभोंवतींची श्रोत्यांची गर्दी कधींच हटली नसती. त्याच्या वाणीच्या सामर्थ्यामुळें त्याचे मित्रमंडळ मोठे विशाल झाले आहे. गांवोगांव त्याची घरें आहेत.

सांगलीच्या विलिंग्डन कॉलेजच्या वसतिगृहांत बसून तो पुण्याच्या बंगल्यांतील मित्रांच्या गोष्टी सांगेल. पुण्याच्या मित्र मंडळांत बसून तो सांगलीच्या कॉलेजांतील कालवडीच्या कथा ऐकवील. पंढरपूरच्या रेल्वे क्वार्टर्समधले वातावरण तो नुसत्या शब्दांनीं उभें करील आणि करगणीच्या वाड्यांत नांदणारें कुटुंब त्याच्या भोंवती कोंडाळीं करून ऐकत बसेल. आपले मित्र व त्यांचे वैभव हा त्याच्या कथनाचा मुख्य विषय असतो. तो स्वतःविषयीं



## शाहीर

कधींच बोलत नाहीं. बोललाच तर अत्यंत तुच्छतापूर्वक बोलतो. स्वतःकडे नेहमींच कमीपणा घेतो. आत्मनिंदा हें त्याच्या विनोदनिर्मितीचें हमखास साधन. त्याचा गोष्टीवेल्हाळपणा सर्वांनाच आवडतो. त्याच्या तोंडावर सर्व गांवकरी त्याची चाहदारी करतात पण पश्चात् बोलतांना त्याच्याबद्दल अनेक तोंडांनीं अनेक तऱ्हेचे बोल बरळतात.

कुणी म्हणतात शाहीर ' थापाड्या ' आहे. कुणी म्हणतात तो ' आपमतलबी ' आहे कुणी बोलतात तो ' पक्का धूर्त ' आहे. कुणी सांगतात त्याचें बोलणें म्हणजे ताकापुरतें रामायण असावें. लोकांची ही मतें शाहीरच्या कानीं पडतात तेव्हां तो हंसतो आणि म्हणतो.

**' रामी रामदास म्हणे, कोण आहे कोण जाणे '**

त्याला शाहीर म्हणतात पण पोवाडे रचणें गाणें त्यानें केव्हांच सोडून दिलें. आहे. लहानपणीं त्याचा आवाज खरोखरच चांगला होता. तेव्हां तो पोवाडे





अनुक्रमणिका

म्हणत असे, रचीतहि असे. तेव्हां नांव मिळालें तें तसेंच राहिलें आहे. गाव वाहून गेला आहे. नांव राहून गेलें आहे. त्याचें खरें नांव यशवंत. लहानपणीं आम्ही हांक मारीत असूं ' येश्या—'

येश्या आणि मी लहानपणापासूनचे मित्र. लंगोटीयार हा टीचभर शब्द आमच्या प्रेमसंबंधाला पुरा पडणार नाहीं. त्याची माझी पहिली ओळख झाली तेव्हां आमच्या दोघांच्या कमरेला ' गोफच नुसते निळे रेशमी ' होते. येश्यांला भावंडेहि चांगलीं लाभली होतीं. त्याचा मोठा भाऊ आम्हालाच मास्तर होता. ' अनलस मी तुज नित्य भजावे ' हें गाणें जेव्हां पंडित मास्तर आम्हाला म्हणायला शिकवायचा तेव्हां अननसाच्या आठवणीनें आमच्या दोघांच्याहि तोंडाला पाणी सुटायचें. पंडित मास्तरांच्या पाठीवरचे येश्याचे आणखी दोघे भाऊ मिळवते होते. येश्या चौथा. ती सारी भावंडेहि त्याचं कौतुक करायची. मला मोठा भाऊच नसल्यामुळें शाहीरचं तें सुख पाहून मला मनांतल्या मनांत आनंद व्हायचा. त्या साऱ्या कुटुंबाबद्दलचा जिव्हाळा माझ्या गळीं दाटायचा. भाऊ—भाऊ असल्यासारखेच आम्ही दोघं एकत्र खेळायचों, दंगाधोपा करायचों, खोड्या मोडतोड मारामारी सारेंच पार्तीत चालायचें. खोड्या करून हातपाय दमले म्हणजे मात्र ओढ्याच्या वाळवंटांत बसून पुढच्या आयुष्याचे मनोरे रचायचे.

' आपण मॅट्रिक पास होऊं, कालेजांत जाऊं, बी. ए., एम. ए. होऊं, मोठमोठ्या नोकऱ्या मिळवूं. आबा, आईला सुखांत ठेवूं ! ' ही येश्याची त्या वेळची मनीषा होती. ती कधींच पुरी झाली नाहीं...

ओली वाळली भाकरी खात आणि माणदेशी मातींत लोळण फुगड्या घेण्यांत आमचें आयुष्य एकत्रच गेलें पुढें आम्हीं औंध हायस्कूलांत शिकलों. तिथेंच येश्यानें शाहीर किताब मिळविला. त्याचा एक भाऊ श्रीमंत औंधकरांच्या वाड्यांत खाजगीकडे कारकून होता. येश्या त्याच्याकडे राहत नव्हता. भावाभावांतलें जुनें प्रेम तोंपर्यंत मावळतीला आलें होतें, कीं काय कोण जाणें ! शाहीरनें तसें कधी सांगितलें नाहीं. शाहीर आणि मी संस्थानीं मोफत बोर्डिंगांतूनच आपली माधुकरी आणीत होतों. विद्यार्थ्यांसाठीं बांधलेल्या पंचवटी नांवाच्या वसतिगृहांत राहात होतों. आमचे दोघांचे मिळून तीन सदरे आणि पांच चड्डया होत्या. कोट नव्हतेच. येश्याजवळ घोंगडीचा एक ग्रेट कोट होता. थंडीच्या दिवसांत तो आम्ही दोघे पांघरीत असूं. औंधच्या बोर्डिंगचें अन्न भयंकर असे. बोर्डिंगमधील भाकरी वर काळी होई आणि तळी हिरवीच राही. भातांत जीव सांपडत. ते चिमटीनें उचलून शाहीर शाळेंत शिकलेलें सुभाषित म्हणे ' अन्नात् भवन्ति भूतानि ! ' त्या अन्नाची किळस बसली तेव्हां शाहीरनें बोर्डिंगच्या स्वैपाकिणबाईशीं स्नेह जोडला. ती भाकरी भाजीत असतांना हा तिच्याजवळ जाऊन बसे. त्या बाईचा एक मुलगा आमच्याच शाळेंत शिकत होता. शाहीर त्या पोराचे नित्य नवे गोडवे गाई, आणि पुत्रस्तुतीनें प्रसन्न झालेल्या त्या मातेकडून आमच्या दोघांच्या भाकऱ्या खरपूस भाजून घेई. काढून ठेवलेल्या आमटीचा हविर्भाग आमच्या मुखीं पडे. ' बोलणें ' या एकाच गुणांवर शाहीर औंधच्या राजकुटुंबांतील मुलांकडून पुस्तकें मिळवी. पेन्सिला मिळवी. आम्ही दोघेहि अभ्यास करीत असूं. पण अभ्यासापेक्षां विचार करण्यांतच आमचा वेळ अधिक जाई. श्रीमंती आम्ही फक्त पाहिली होती. ती आम्हाला असावी हाच आमच्या विचारांचा कणा असे. लहानपणीं वेड्यांतील ओढ्यांत आम्ही बोलत बसत होतों. कळतेपणीं औंधच्या मूळपीठ टेकडीवर चढून बोलत बसूं लागलों. तेव्हांचे मनोरे वाळूचे होते. आतांचे तर केवळ हवेंतच उभारीत होतों.

' आई बाबांचे फार हाल होतात ' शाहीर म्हणे.

' कां ' मी विचारी.

' पंडित मास्तर वारले. मिळवता माणूस कमी झाला. आबाहि घरीं बसले. पेन्शन झाली त्यांना. पैसा कमी पडतो.'

' इथला भाऊ नाहीं पैसे पाठवीत ? ' मला प्रश्न पडे.

' त्याचा त्याला संसार आहे ' शाहीर उत्तर देई.

' मॅट्रिकनंतर नोकरी करावी आपण दोघांनीहि ' मी सुचवी.

शाहीर गप्प होई. त्याची बुबुळें लकलकत राहात. अर्धा अर्धा तास तो मुकाच राही. मग झटक्यानें उठत म्हणे ' छे, पुढें शिकूं — पुण्यास जाऊं जाऊं पुण्याला...'

कसलं पुणं न कसलं काय ! आम्ही पुण्याला गेलों ते मॅट्रिकच्या परिक्षेपुरतेच. परिक्षा झाली आणि दोघेहि गांवीं आलों. गांवांतल्या लोकांना आम्ही सांगत होतो. ' पेपर उत्तम गेले आहेत' म्हणून पण आमचे आम्हांला भवितव्य पुरतें ठाऊक होते.

रिझल्ट लागला आणि—दोघेहि उत्तम रीतीनें नापास झालों. पुढें सहासात वर्षे शाहीरची नि माझी भेटच झाली नाहीं. मी चित्रपट सृष्टीकडे वळलों. शाहीर गांवच्या जवळच एका गांवीं एका मोठ्या इथापाऱ्याकडे दिवाणजी म्हणून चिकटला. आम्ही आपापल्या जीवनाच्या चढणीला लागलों. ओझें इतके होतें कीं एकाला दुसऱ्याकडे वळून बघतांच आलें नाहीं.

मग शाहीर मला भेटला तो माझ्या लग्नांत. तो आला तसा त्यानें कार्याचें पुढारीपण घेतलें. त्या वर्षी पाण्याचा दुष्काळ होता. त्यानें माळेची कल्पना काढली आणि दूरवर असलेल्या पाण्यानें हौदच्या हौद भरून टाकले. समारंभ जोरदार पार पडला. शाहीर म्हणाला, ' तुझें लग्न नामदेवाच्य लग्नासारखे झाले. '

समारंभ आटोपला. पाहुणे गांवोगांव परतले. एका संध्याकाळी, गांवांतील ओट्यावर, मूळपीडच्या डोंगरावर बसत होतो, तसे आम्ही दोघे रंकाळ्याच्या काठावर बसलों. मी माझी यात्रा त्याला निवेदन केली. तिथपर्यंत कसा पोंचलों तें माझ्या बालमित्राला सविस्तर सांगितलें.

शाहीरला मनःपूर्वक आनंद झाला. ओलावल्या स्वरांत तो म्हणाला, ' हे दिवस दिसतील असें तरी कधीं वाटले होतें ? '

' तुझे कसें काय चालले आहे शाहीर ? ' मी विचारलें,

' ठीक आहे. आतां मीहि लग्न करीन. आबा तर गेलेच. पंडित मास्तरही गेले. त्यांची बायकामुलं आहेत. मधल्या भावंडांचे त्यांचे त्यांचे प्रपंच वाढले आहेत. वसंता आहे धाकटा—तो मार्गाला लागला कीं झालं. आईची सावली आहेच. '

' नौकरी कशी आहे तुझी ? '

' फार सुखाची. तूं आणि वैनी चला आतां माझ्या नौकरीच्या गांवी. माझी जागा सुंदर आहे. अगदीं बॉंबे-ब्लॉक आहे म्हणेनास. हवापाणी उत्तम. गांव चांगलं. चार दिवस सुखांत रहा ! '

त्याच्या आग्रहामुळें मी त्याच्या नौकरीच्या गांवी गेलों, आणि त्याचे चंद्रमौळी ऐश्वर्य पाहून थंड पडलों. त्यानें बॉंबे ब्लॉक म्हणून वर्णन केलेली जागा म्हणजे ओबडधोबड बांधणीच्या दोन अंधेऱ्या खोल्या होत्या. त्याचे








नौकरीचें गांव भयाण आणि भकास होतें. त्याची नौकरी म्हणजे शुद्ध गुलामी होती. सावकाराच्या दुकानीं त्याला दिवसाचे दहा तास राबावें लागत होतें. शाहीरला जणूं ते सारें सुखाचें वाटत होतें.

आम्ही तिथें गेल्यावर त्याला कोण आनंद झाला. आमच्या भोजनाची सोय त्यानें आपल्या श्रीमंत मालकाकडे केली. मालकांकडच्या गाद्यागिरद्या स्वतःच्या डोक्यावरून वाहून आणल्या आणि आमच्या विश्रांतीची सोय केली. आमची अंथरुणें देखील त्यानेंच पसरली. मोठ्या प्रसन्नपणें म्हणाला 'आतां उपभोगा सुखांत तुमचा मधुचंद्र!'

त्या माणसाला काय म्हणावें तेच मला कळेना. ज्या त्या गोष्टीचा त्याला आनंदच. दुःख असें कशाचेंच नाहीं. मला मात्र त्याचे तें एकाकी आणि कष्टि जीवन पाहून अपरिमित वाईट वाटलें. मी मनांत ठरवलें 'याला येथून हलवायचाच एकाद्या कुग्रामांत कारकुनी करीत दिवस काढावे इतका कांहीं माझा मित्र गुणहीन नाहीं. त्याला आवाज आहे. बोलण्याची कला अवगत आहे. अभिनय करणेंहि त्याला अशक्य नाहीं. चित्रसृष्टींत मला वाट मिळाली तर याला कां मिळूं नये. याला येथून न्यायचेंच.'

माझ्या मनी आलें तें झालें नाहीं. शाहीरकडून परतल्यावर मी माझ्याच वाट चालीत गुंतलों. आयुष्यें परत समांतरच्या समांतरच राहिली. शाहीरचें लग्न झाले. त्यानें संसार मांडला त्याला मुलें झाली.

मी पुण्यास येऊन बिऱ्हाड केले पुण्याच्या चित्रसृष्टींत मला चांगला वाव मिळाला. पैसेहि चांगले पदरीं पडूं लागले. माझे वडिल अत्यंत आजारी असल्याचे कळले म्हणून मी घाईघाईनें खेड्यावर गेलों. शाहीर माझ्या अगोदर हजर झाला होता. वडिल वाचावेत म्हणून आम्ही पुष्कळ प्रयत्न केले. आम्हांला यश आले नाहीं. वडिल गेले. मला एकाएकीं आपले वय फार वाढल्याचा साक्षात्कार झाला. मस्तकावरची जबाबदारी जिवापेक्षां जड झाल्याची जाण आली. शाहीरनें एकाद्या प्रौढ नातलगासारखे मला जवळ घेतले. माझे अश्रु पुसले. स्वतःच्या गंहींवर आवरत तो म्हणाला.

'मरे एक त्याचा दुजा शोक वाहे
अकस्मात तोही पुढें जात आहे।

समर्थांनीं लिहूनच ठेवलें आहे.'

दुःखाचा लोंढा ओसरून माझ्या विचारांचे पाणी पुरे निवळेपर्यंत शाहीर राहिला. माझ्याजवळ राहिला. मला सोडून हलला नाहीं. जायला निघालों तेव्हां त्यानें मला एकच गोष्ट कळकळून सांगितली. 'वडिलांच्या श्राद्धासाठीं दरवर्षी या दिवसांत खेड्यावर येत जा. तुझ्यावर रामाची कृपा आहे. सारें चांगलें होईल—'

बघतां बघतां वर्ष गेलें. पौषाचा महिना आला तशी मला शाहीरच्या बोलण्याची आठवण झाली. वडिलांच्या वर्षश्राद्धासाठीं मी खेड्यावर आलों. मी पोचलों न पोंचलों एवढ्यांत शाहीर आला. मी मुलाबाळांसह आलों होतो. माझे प्रत्येक पोर त्यानें कडेवर घेऊन फिरवलें. आपल्या वैनीशीं त्यानें मनमुराद गप्पा केल्या. प्रत्येक वेळीं त्यानें तिला इतके हंसविलें कीं हंसतां हंसतां तिचे डोळे वाहूं लागले.

'अरे एवढी कसली खसखस पिकलीय्!' मी ओरडून विचारलें.

'शाहीर भावजी कथा सांगताहेत!'

'कसल्या?'

'तुमच्या लहानपणींच्या!'

**भाषा मराठीच** : कोंकणी

# सर्वज्ञ दामुदाद

वरोवरच्यानीं दामुदादाक 'सर्वज्ञ' हें नांव दवरलें म्हणुन, पोरांतोगर्नीय ताका 'सर्वज्ञसर्वज्ञ' म्हुणुन चकच्छायो करच्या इतलो दामुदाद सोपो नाशिल्लो. रत्नपारखो, ज्योतिषी, गांवच्या नाटकांतलो बऱ्यांतलो नट, वेळोवेळीं पोक्त सल्लो दिवारो, अशा अनेक गुणाच्या ह्या पुतळ्याकडे नाशिल्लो फक्त पैसो! आणि ताका लागून गांवांत ताज्या गुणाची किंमत जाली ना! पुणुन असो एक वेळ आयलो आणि ज्याच्यामुळें दामुदाद अमर जालो—ती गजाल अशी.

गांवच्या खाडीच्या उदकान भरून व्हांवपाच्या व्हडल्या व्हाळाचेर पुलावजा एक सांकव बानपाचो आशिल्लो. सरकारान पावणी केली, आणि गांवकाऱ्यांनीं ती हाडली. पुणून् व्हाळावयलो 'देंवचार' सांकवाचे मधले खांबे काय उबे रावंक दिनाजालो. अनेक खटपटी जाल्यो. वायते विजनेरानीं प्रयत्न केलो, खांबे उबे जांवचे, आणि दुसऱ्या दिसा सकाळीं पळेल्यार मोडून पडलेले दिसचे. शेवटीं जायत्यो आंगवण्यो करून पळयोल्यो; पुणुन, बोकडो, मणभर शीत, कोंबों नाल्ल असल्या आंगवण्यांक काय देंवचार वदना जालो.

शेवटीं धा जाणानीं मिळून दामुदादाक विनंति केली, आणि गांवच्या कल्याणाखातीर ताणें ती मानली. गांवकाऱ्यांबरोबर तो व्हाळार गेलो आणि ताणें देंवचाराक गाराणें घालें, "हे साकळया, दोनीय खांबे उबे जावनी, सांकव बांनून जावनी, तो पूर्ण झाल्या-नंतर, तुका धा पायांचें जनावर दितां!"

गाराणें घालून सगळे परतले आणि दुसऱ्या दिसा दोनीय खांबे उबे जाले. सांकव बांधून जालो. सगळे जलें. पुणून धा पायांचें जनावर खंयचे हाडचें! हो मात्र सगळ्यासमोर प्रश्न पडलोलो; पुणून दामुदादाक तो पडूंक नाशिल्लो!

दामुदादान शेजारच्या कायतानांक उलो केलो, एक बरी व्हडली कुल्ली हाडली, ती भाजली, सोरो आणि रोंट बरोबर घेतलें आणि सांकवार वचून "हें घे तुझें गाराण्याप्रमाणें देणें" म्हणून देंवचाराची आंगवण थैं दवरली आणि परतून आयलो. उतरानीं बांधलोलो देंवचार फुडें केन्नाच जागो जालोना.

'सर्वज्ञ दामुदादाच्या घरांत मात्र लात्रेचें स्वरूप आयलेलें.

**गोपाळ शेणै**

● ●

१ खेंकडा.





शाहीर परत माझ्याच कथा सांगत होता. स्वतःच्या नव्हे. त्यानें सांगितली नाहीं तरी त्याची चित्रकथा मला दिसत होती. त्याचाहि प्रपंच वाढीला पडला होता. प्रमोशन वा पगारवाढ याचा मुळींच संभव नाहीं. अशी त्याची नोकरीहि मला माहीत होती. तो नक्कीच गांजलेला असावा पण त्यानें ते कधींच सांगितलें नाहीं. विचारलें तर उत्तरला—

'संसार म्हणजे स्वर्गीच स्वार'

आपल्या कष्टाचा त्यानें थांगपत्ता लागू दिला नाहीं. यावर्षीच मात्र त्याचा कर्मठपणा मला नीटपणें न्याहळतां आला. तो सर्वांआधीं उठे. थंड पाण्यानें स्नान करी. ज्ञानेश्वरी तुकारामाची गाथा आणि दासबोध हे नित्य त्याच्या बरोबर असत. त्यांतील कांहीं प्रकरणें नित्यनेमानें वाची आणि मग दिवसभर गप्पा आणि आनंद.

न राहून मी पुनः पुनः विचारी 'शाहीर तुला पगार काय मिळतो ?' तो हंसून उत्तर देई.

'निर्वाहापुरतें अन्न अच्छादन

'आश्रयास स्थान, खोपी गुहा.'

त्याच्याबद्दल विचारलेल्या प्रश्नाला तो उत्तर देतच नसे. वैयक्तिक त्याच्याविषयी पुसले कीं त्याचे मुखीं समर्थवाणी संचारून येई. चेहऱ्यावर नुसतेंच हंसे उमटे. आपल्या गृहस्थितीचा पत्ता त्यानें होऊन कधीं मला लागूं दिला नाहीं. चारपांच वर्षांत कधीं लागूं दिला नाहीं. बाकीच्या लोकांकडून मला त्याच्याविषयीं कळत राहिले. तो स्वतःकधीं बोलला नाहीं.

पांचसहा वर्षांपूर्वी तो अचानक पुण्याला आला. तसाच अवतार-हातधुलाईची गांधी टोपी, मांजरपाटाचा नेहरुसदरा, अस्थिर बुबळें, बुटकी अंगलट आणि अनवाणी पाय—

आला आणि सैंपाक घरांत पाट घेऊन, मांडी ठोकून बसला. डाव्या हातानें उजव्या पावलाचा तळवा खसाखसा चोळीत म्हातान्यासारखा आवाज काढून माझ्या पत्नीला उद्देशून म्हणाला 'वैनी, थोडा मोहनभोग टाका'

'मोहनभोग !' माझ्या पत्नीला हा पदार्थ माहीत नव्हता.

'अहो मोहनभोग म्हणजे शिरा !'

तिनें लगबगीने शिऱ्याची सिद्धता केली. शाहीर म्हणाला, 'अहो मला नकोय. मी आपली गोमेवाडीकर इनामदारांची नक्कल केली. गोमेवाडीचे एक इनामदार होते. त्यांच्या घरीं पाहुणे आले कीं ते सुनेला हांक मारीत आणि मोठ्यांदा ओरडून सांगत 'तानूबाई थोडा मोहनभोग टाका...'

मग त्यानें गोमेवाडीकरांचा अध्याय लावला. माझी बायको पुनः हंसून हंसून बेजार झाली. शाहीरचा स्वभाव अधिकच खेळकर आणि आनंदी झाला होता.

'तूं अजून जुन्याच जागीं आहेस !'

'हो'

'मुलं किती आहेत ?'

'लग्नाला जितकी वर्षे झाली त्यातून उणा एक !'

'मग हसतोस कसा ?' हें विचारणें मला साधले नाहीं. शाहीर चांगला पंधरा दिवस थांबला. त्याचे प्रातस्नान, पोथीपाठ सारे कांहीं यथास्थित चालू होते. घरांतली माणसे शाहीरने सांगीतलेल्या कथा आठवून आठवून हसंत होती.

'असं काय सांगीतलं ग तुला शाहीरनं ?' मी एक प्रकारें चिडूनच बायकोला विचारले. शाहीर तिथेंच होता पण बोलला नाहीं. हसंत हसंत माझी पत्नी सांगूं लागली—

'अहो शाहीरभावोजी म्हणे कुणा एका शहरांतल्या मित्राकडे गेले. तो मित्र घरीं नव्हता. यांनी आपली पिशवी खाली ठेवली आणि म्हणाले 'मी थोड्या वेळानें परत येईन' 'पिशवी कशाला ठेवतां मग ?' मित्राची बायको ठसकली. शाहीरभावजी थंडपणानें म्हणाले,

'अहो मग इतकं ओरडतां काय ? माझीच पिशवी मी तुमच्याकडे ठेवतो आहे. तुमच्याकडचं कांहीं घेऊन तर निघालों नाहीं,' मलाहि हंसूं लोटले काम थोडेंसे बाजूला सारून मग मीहि त्याच्या कथा ऐकूं लागलों. किती तऱ्हेच्या माणसांची स्वभावचित्रें शाहीरच्या गांठी होती. त्याची विनोदबुद्धि किती निरागस आणि तल्लख होती. तो नेहमींच आप ल्याकडे राहावा असें मला प्रामाणिकपणें वाटूं लागले. आग्रह करकरून मी त्याला ठेवून घेतले. तो माझ्याकडे पाहुणा असतानांच गांवाकडच्या एका मित्राचे अनाहूत पत्र आलें, 'शाहीरची नौकरी गेली आहे. त्याच्यां स्वभावामुळें त्यांनीं सावकारांच्या सरकारी दुकानांतील दोन पांच हजारांचा माल उधार दिला आहे. ती उधारी जवळ जवळ बुडीत आहे.'

मी त्या पत्राचे तुकडे तुकडे करून टाकले. शाहीर माझ्याकडे आपणहून गोष्ट कधीं काढतो याची वाट बघूं लागलों.

जायला निघण्याच्या आधल्या रात्रीं शाहीर सहज मला म्हणाला, 'आपल्या बंगल्याच्या ओट हौसवर बंगला बांधावा ?'

'कशाला ?'

'भाड्यानें देता येईल कांहीं तरी निश्चित् उत्पन्न होईल !'

'आतां अधिक investment कुठून करणार शाहीर ?'

''मनी आणावें तें तें होते
दुःख अवघेंचि विरोनी जाते
कृपा केलिया रघुनाथें
प्रचीति येते—' तुझ्यावर देवाची कृपा आहे.'

मला कांहीं तरी खड लावून विचारायचे होते. तें एव्हांहि साधले नाहीं. शाहीर बैठकीवर बसला. पान खाण्याच्या आधीं त्यानें माझे पानदानाचें कौतुक केलें. मग पान खाल्ले. तक्क्याशीं रेलला आणि हलकेंच म्हणाला—

'एक दोन हजार रुपये आहेत कां तुझ्या बँकेंत ?'

'Yes !' मी उत्साहानें म्हणालों.

'उद्यां एक चेक दे आमच्या सावकाराच्या नांवावर.'

'जरूर.'

बोलल्याप्रमाणें मी त्याला चेक दिला. अत्यंत जिव्हाळ्याच्या मित्राला योग्य क्षणीं थोडें साह्य केल्याचा आनंद माझ्या पोटांत मावत नव्हता.

मी कांहीं द्वारकाधीश श्रीकृष्ण झालों नव्हतो पण त्याची हालत खरोखरच सुदाम्यासारखी होती. त्याला मदत करूं शकल्याचा आनंद मी उणेंपुरें पंधरा दिवस अनुभवला. एके दिवशीं सकाळीं त्याच्या मालकांच्या दुकानाकडून मला एक पत्र आले. शाहीरविरुद्धचीच कागाळी असावी या कल्पनेनें मी बंद पाकीट उघडले. आश्चर्यानें थक्क झालों.

'आपणांकडून दोन हजार रुपये आमच्या पेढीवर ठेव म्हणून आले तें पोंचलें. जमा केले आहेत ×× प्रमाणें व्याज दिलें जाईल.'

शाहीरानें ते पैसे स्वतःसाठीं नेले नव्हते. माझ्या खर्चिक स्वभावामुळें कमाई होते पण मागें राहात नाहीं ही जाणीव होऊन त्यानें उपद्व्याप केला

[ पान ४८ वर पाहा



अनुक्रमणिका

गोमंतीचीं सांस्कृतिक पदचिन्हें : १

# संगीत

— गोपाळ कृष्ण भोबे



**मा**झें घराणें अत्यंत कर्मठ "आचारो प्रथमो धर्मः" या वृत्तीचें.

कोंबड्याचा पहिला साद ऐकून आमच्या घरांतली वडील माणसें नित्यक्रमाला आरंभ करायची. यावेळीं प्रातःस्मरणाचा अगदीं जल्लोस उडालेला असे. पडवींत भूपाळी चाललेली असे, तर माजघरांत व्यंकटेश स्तोत्र चाललेले असे, माडीवर रामरक्षा, तर ओस्र्यावर 'राणूदादा' "रामा दयाघना कृपा करुनि मज पाहीं। जरि मीं अपराधी ॥ अशी अभंगांतून आळवणी करीत असत. इतक्यांत सडासंमार्जनाचा आवाज कानीं पडे, आणि त्याचबरोबर घरांतल्या जाणत्या बाईनीं म्हटलेलें सुस्वर असें "गौळियांचे कुळीं। जन्मला गोकुळी। माझा वनमाळी। परब्रह्म। हें संपूर्ण कृष्णलीलामृत गीत ऐकूं येई. श्रीकृष्णाच्या बाललीला, आणि त्याचा बाळपणांतील पराक्रम कथन करणारें हें गीत मोठें रसपूर्ण आहे. आणि तें म्हणतांना ती बाई त्यांतील प्रत्येक कडवें निरनिराळ्या चालीवर म्हणत असे! भूपाळी, व्यंकटेश स्तोत्र, रामरक्षा, अभंग आणि गीत ह्या साऱ्यांचा एकनाद कानीं पडे. हें सारें एकदम होत असलें, तरी त्या प्रत्येकाला एक लय होती, सूर होता, आणि प्रमाणबद्धताही होती. त्याच्या गोडव्यामुळें हें सारें कानावर पडतांना एका गोड वातावरणाचा आनंद अनुभवायला मिळे. आणि त्यांतल्या विलक्षण गोडव्यामुळेंच ऐकतां ऐकतांच हें सारें मला पाठ झालें होतें. पुस्तकांतून तीं स्तोत्रें वा भूपाळ्या मीं तरी कधींही पाठ केलेल्या नाहींत.

आज तें वातावरण आठवलें—तें "रामा-दयाघना" आठवलें कीं ललत रागाचे सूर कानावर आदळतात, 'ऊठिं गोपाळजी' आठवलें कीं देसकाराचे सूर आठवतात आणि तें "गौळियांचे कुळीं। जन्मला गोकुळीं।" आठवलें कीं रसपूर्ण रागमालिकाच डोळ्यां-समोर उभी राहाते.

वास्तविक हीं सगळीं माणसें एका कर्मठ वातावरणांत वाढलेलीं. गाणें कशाशीं खातात हें माहिती नसलेलीं. आणि नटांचें तोंड पाहाणें शास्त्र विरुद्ध" म्हणून त्याकाळीं होणाऱ्या दशावतारी खेळांना किंवा संगीत आख्यानांना सुद्धां न गेलेलीं अशीं!

तिन्हीं सांजेची वेळ, गाई गोठ्यांत परतता-हेत. "बहुधन असो नसो परि एक असावें गृहीं गृहीं दुभते" हें तत्त्व उराशीं बाळगून, दुभत्यांची सेवा करणारा माझ्या घरचा गृहस्थ "जन्म साफल्यता करीं नारायणा" म्हणून आर्त स्वरानें नारायणाची आळवणी करतो आहे, ते सूर आतां आठवले की 'मुलतानी' कानांत घुमते; अशावेळीं वाटतें, परमेश्वरानें जन्माला घालतांनाच यांना सामवेद शिकवला होता का! मग ह्यांना हें रागज्ञान झालें कुठून? हे प्रमाणबद्ध सूर यांच्या गळ्यांत आले कुठून! याला एकच उत्तर आहे, तें "देणें ईश्वराचें!"

मात्र हें ईश्वराचे देणें भगवद्भजनासाठींच वापरलें जात होतें. त्याला त्यानीं स्वैर सोडलें नव्हतें इतकेंच!

माझ्याच नव्हे प्रत्येक गोमंतकीय कुटुंब-वत्सल गृहस्थांघरीं हें असेंच चाले. अगदीं असेंच परमेश्वराचें स्तवन भजन तालासुरांत चाले. योगक्षेम देखील त्यानीं कसा तालासुरांत चालवल्यासारखा वाटे!

परंतु या वातावरणांतला प्रभु कृपेचा वरदहस्त होता, तो अंत्रुज महालावर देवांची वस्तीच तेथें असल्यानें त्याच्या आसमंतांत राहाणाऱ्या सेवेकऱ्यांवर! या सेवेकरी स्त्रीयांना देवाच्या शिबिकोत्सवाच्या वेळीं कांहीं पारंपारीक पदें, झुले वगैरे म्हणावे लागत. त्यांच्या सांथीला फक्त मृदंग, घुमट आणि झांज असे! मंगेश, शांतादुर्गा, महालक्ष्मी रामनाथ, आदि देवांच्या पालख्यां समोर "पेणीं" होतांना, ह्या गाणाऱ्या सेवेकरिणींचे गुण कमी अधीक प्रमाणांत दिसून येत तेवढेच. त्यांत चढाओढीची ईर्षा नव्हती. शास्त्राची जाणीवच नसल्यानें चढाओढ तरी कुठून येणार! परंतु आपल्याच नादब्रह्माच्या गुंगींत राहणाऱ्या आणि त्याच्यांतच सारें विश्व सामावल्याच्या कल्पनेच्या तंद्रींत असलेल्या ह्या ईश्वर पाइकांना पहिला धक्का दिला तो विठोबा अण्णा हडपानीं!

हडप त्या वेळीं सावंतवाडीहून गोव्यांत आले होते. ग्वाल्हेर घराण्याची गायकी त्यानीं आत्मसात केली होती. ध्रुपद-धमार, झपताल, सवारी प्रबंध आदि गायन प्रकारांची त्यानीं साधना केली होती.

पहिल्या प्रथम बांदोड्याच्या महालक्ष्मीच्या देवळांत ते गायले. त्यावेळीं तिथल्या पालखी-समोर झुला आणि अभंग म्हणणाऱ्या, सरस्वति-बाई बांदोडकरांना बुवाचें गाणें ऐकून पहिला साक्षात्कार झाला, आणि गाण्याचें शास्त्र आपण शिकलें पाहिजे अशी प्रेरणा झाली. बुवांना त्यानीं विनंती केली आणि बुवानीं ती मानलीही.

गोमंतकांत शास्त्रीय गाणें शिकली ती ही पहिली बाई असें जाणकार वयोवृद्ध सांगतात. अर्थातच बांदोड्याच्या पालखीसमोर होणाऱ्या 'झुला' आणि अभंगा बरोबरच ध्रुपद आलं, धमार आला, झपताल आला आणि प्रबंधही गायला जाऊं लागला, अतएव बांदोड्याची









पालखी साम्रसंगीत झाली आणि इथूनच नव्या स्पर्धेचा उगम झाला असें म्हणायला हरकत नाहीं; कारण बांदोड्याच्या या प्रगतिकडे रामनाथकरानीं डोळेझांक केली नाहीं. तिथल्या पालखीची शोभा म्हणजे 'शाणेबाई रामनाथकर.' त्यानांही प्रेरणा झाली आणि त्यानीही हडप-बुवाचें शिष्यत्व पत्करलें.

सरस्वति बांदोडकरांची परंपरा त्याच घराण्यां-तील केशरबाई बांदोडकर, गिरिजाबाई केळेकर आणि ज्योत्स्नाबाई भोळे आज चालवित आहेत. आणि रामनाथकरांची परंपरा रघुवीर रावजी पेटीवादनाच्या रूपानं आणि गाण्यानं रत्नकांत रामनाथकर चालवीत आहेत.

शास्त्रीय संगीताचा हा पाया ज्या शुभमुहू-र्तावर विठोबाअण्णांनीं घातला, तो मुहूर्त अमृत-सिद्धियोगाचाच असला पाहिजे. कारण तेव्हां-पासून त्यांनीं शिंपलेले हें रोपटें, हळूहळू वृक्षरूप व्हायला लागलें होतें.

हडपांच्या मागून अनंतबुवा आले तेहि ग्वाल्हेर घराण्याचेच होते; त्यांनीं आपलें प्रस्थान कपिलेश्वरीच्या बाजूला वळविलें आणि रामू-बाई कपिलेश्वरींना शिकविलें! आतां ईर्ष्या उत्पन्न झाली होती, स्पर्धा वाढली होती आणि प्रत्येकाला कांहींतरी नवें हवेंसें वाटायला लागलें होतें, तें दत्तुबुवा भिडे घेऊन आले.

दत्तुबुवा, बाळकृष्ण इचलकरंजीकरांचे शिष्य. ध्रुपद धमारांबरोबरच ख्याल गायकीचा प्रकार त्यांनीं प्रचारांत आणला. अर्थात्‌च गोमंतकाला तो नवीन होता. याचवेळीं मुराराबा पेडणेकर हे गोमंतकीय कलावंत उत्तर हिंदुस्थानांतील नामवंत 'इमदादखाँ' नांवाच्या मुरब्बी उस्तादांकडे तबला, सूरसिंगार, पखवाज व गाणें इत्यादि विषयाचें अध्ययन करून आणि गुरुगृहींचा आशीर्वाद घेऊन परत आले. गोव्यांत पडलेलें त्यांचें पाऊल गायन वादनांत आमुलाग्र क्रांतीचें ठरलें. मुरारबानीं अनेक शिष्य-शिष्यिणीं तयार केल्या. गायनवादन कलेला त्यांनीं रसाळपणा आणला!

आणखी एका गोष्टीनें ह्या सर्वांवर ताण केली. गायन प्रांतांतल्या एका बहुश्रुत विद्वानाचें आगमन झालें तें म्हणजे "रामकृष्णबुवा वझे" यांचें. उपरीनियुक्त गायनाचे सर्व प्रकार तर त्यांच्या जवळ होतेच; परंतु ह्या सर्व प्रका-रांच्या पोतडी बरोबरच, आपल्या काखोटींत टप्पा, ठुंबरीही त्यानीं आणली होती. बुवानी दत्तीबाई नागेशकर, केशरबाई तसेंच बाब्ली-बाई वगैरेना शिक्षण देण्यास सुरवात केली होती.

आपल्या मनमिळाऊ विनोदी स्वभावानें प्रतिष्ठितांपर्यंत रामकृष्णबुवानी आपली वर्णी लावली. त्यामुळें गाणें शिकणें, ही गोष्ट जिथें निषिद्ध समजली जात होती, तिथें प्रबोधन व्हायला लागलें, व केवळ षोकासाठीं असो किंवा स्वतःच्या मनरंजनार्थ म्हणून असो 'लामगांव-कर' 'देसाई' वगैरे घराण्यांत गाणें शिरलें.

ही संगीताबद्दलची आस्था बुवानी तिथें उत्पन्न केली असली तरी गोमंतकांतल्या मध्यम वर्गाला या विषयाबद्दल—पदरीं असून देखील—कां अढी वाटली कळत नाहीं.

घराघरांत त्यावेळीं नामसप्ताह होई. चोवीस तासांचे अवधींत प्रत्येकाला पाळीनें कांहीं ना कांहीं ईश्वर भजन करावें लागे. त्यावेळीं त्यानीं म्हटलेले ज्ञानदेवाचे, तसेंच तुकाराम मध्व-मुनीश्वराचे रसाळ अभंग तालासुरासकट अजून कानांत घुमताहेत; पण त्याचें चार चौघांत प्रदर्शन करणें म्हणजे त्यांना भयंकर कृत्य वाटे. त्या काळच्या एखाद्या तरुणा-कडून तसें वर्तन झाल्यास सबंध घराण्याचीच अब्रू रसातळाला गेल्याचें दुःख जाणत्यांना होई. गायन-वादनाबद्दलची अशी ही अढी त्यांच्या मनांत कां होती हें अजून उलगडत नाहीं. पुरुष वर्ग असा होता तिथें तत्कालीन स्त्रियांबद्दल काय सांगणार? यामुळें कित्येकांच्या या ईश्वरदत्त देणगीचा जागच्याजागीं नाश झाला!

याला अपवाद म्हणून कांहीं थोडे बंडखोर निघाले. त्यांनी साधना केली. आणि "महा-जनो येत गतः स पंथा" या न्यायानें बाकीच्या होतकरूंना मार्ग मोकळा झाला; परंतु तो मर्यादित होता.

त्या परंपरेचें आजचें उदाहरण म्हणून 'मल्बाराव देसाई' यांचें नांव घेता येईल. मल्बारावांनीं अफाट साधना केली आहे. तबल्याचा तर गाढा व्यासंग, त्यावर एखादें पुस्तक लिहिण्याइतपत ज्ञान! मुरली, दिल-रुबा, पेटी आदि वाद्यांवर सारख्याच तयारीनें त्यांचा हात चालतो, त्यावर अनेक गवय्ये वादनकार ऐकून संस्कारही झालेले आहेत, पण पारंपारिक प्रतिष्ठेच्या दडपणाखालीं हें सारें अज्ञातांतच राहिलें आहे. आणि कदाचित् ते तसें ठेवतीलही! असो!

हडप, दत्तुबुवा, अनंतबुवा, मुराराबा आणि वझेबुवा यानीं तयार केलेल्या शास्त्रीय संगी-ताच्या वातावरणांत तयार झालेल्या कलावंतांचें कौतुकही मर्यादितच व्हायला लागलें. त्यांना तें संकुचित विश्व मानवेना. म्हणून ज्यांना शक्य होतें, ज्यांची ज्ञान पिपासा मोठी होती, त्यानीं बाहेरचा रस्ता धरला आणि स्वतः बरोबरच आपल्या मायभूमिलाही गौरवांकित केलें.

त्यांत बाब्लीबाई पालकर—ही नत्थनखाँ अग्रेवाल्यांची शिष्या, भावनगर संस्थानांत दरबार गायिका होती आणि हिंदुस्थानभर हिनें लौकिक कमावला होता. तानीबाई, नागली बाई शिरोडकर, दुलूबाई पर्वतकर, अंजनी मालपेकर, ताराबाई, सरस्वतिबाई फातर्पेकर, विठाबाई काकोडकर, या सर्वानीं कमीं अधीक प्रमाणांत नांव मिळविलें, आणि या ज्ञानपिपासू लोकांच्या पावलावर पाऊल टाकून केवळ गोमंतकांतच नव्हे तर 'एकमेवाद्वितीयकम' म्हणून 'आसेतुहिमाचल' जिनें नांव गाजवलें त्या केसरबाई केरकरानीं गोमंतकाच्या संगीत परंपरेला एक आगळा उजाळा दिलेला आहे.

सुखासीन परिस्थिति असतांना देखील अन-लस वृत्तिनें साधाना करून जी भावि पिढीचा आदर्श ठरली, तिचें कौतुक स्वहस्ताच्या गौरव पत्रानें कविंद्र रवींद्रानें केलें आहे.

मोगुबाई कुर्डीकरानींही अशीच साधना केली. त्याला हटयोगच म्हणावा लागेल. त्यांची शिष्यपरंपराही आहे. बहुदा स्त्रियांनी गाणें शिकवण्याबाबतचा आजच्या कालांतला हा एक अपवाद. त्यांची मुलगी किशोरी ही त्याच परंपरेंत तयार झालेली आहे.

आवडाबाई सांगेंकर, वत्सलाबाई पर्वतकर, मेनका शिरोडकर, कमल सांगेंकर वगैरे गायिकांनीही अशीच मेहनत करून परंपरा चालू ठेवली आहे.

"गोमंतकाच्या जागृत संगीत व्यासंगानें आम्हाला जगवलें" असें विद्यादान करणारे कांहीं खाँसाहेब निर्मळ मनानें म्हणत असत तें गोमंतकाला भूषणावह असेंच आहे.

नटवर्य दीनानाथ मंगेशकर स्वतःचें विशिष्ठ स्थान आणि परंपरा ठेवून गेले. त्यांच्या मुली 'लता' व 'आशा' यांच्या गाण्याच्या लोक-प्रियतेविषयीं विशेष काय सांगावें?

गोविंद अग्नी, सीताराम फातर्पेकर, श्रीपाद नेवरेकर, सुरेश हळदणकर आणि जीतेन्द्र अभिषेकी आज आघाडीवर आहेत.

गोमंतकाची गेय संगीत पद्धति आज भारतांत सिनेसृष्टींत लोकप्रियतेचा कळस गांठून आहे.

खुद्द गोमंतकांत आज अनेक सुरांचे सच्चे आणि लयीचे पक्के असे जन्मताच देवाचें देणें घेऊन आलेले अनेक तरूण आहेत, परंतु खोट्या प्रतिष्ठेच्या आणि पारंपारीक रुढीच्या आवरणाखालीं दबलेले आहेत. ती कोंडी फोडून आपल्या परंपरेचा नवा इतिहास ते घडवतील तो सुदिन!

अशी ही गोमंतकाची संगीत परंपरा आणि ती घडवणारे तिचे मानकरी जे "झाले आहेत, पुढें होणार, देणें ईश्वराचें!"

● ●

अनुक्रमणिका







मुंबईसारख्या दाट वस्तीच्या शहरांत भर दिवसा पडलेल्या एका धाडसी दरोड्याची आणि त्याच्या तपासाची ही विलक्षण चित्तथरारक कथा या दरोड्याच्या तपासाचें काम करणाऱ्या अधिकाऱ्यानें स्वतः निवेदन केली आहे. ती दीपावलीच्या वाचकांस चित्तवेधक रहस्यकथेहूनाहि अधिक मनोरंजक वाटेल. या दरवड्याचें आणखी एक वैशिष्ट्य असें कीं त्याचा तपास लागल्यावर मुंबईचे राज्यपाल, मेयर आणि मुंबईकर नागरिक यांनीं तपास लावणाऱ्या पोलिसांचें अभिनंदन केलें. शिवाय गंमत अशी कीं या गुन्ह्यांतील सहाहि गुन्हेगारांना शिक्षा झाली आणि त्यांच्याविरुद्ध ठेवलेले सातहि आरोप निःसंशयरीत्या शाबीत झाले —



# रक्तानें रंगलेली दुधगाडी

लेखक : श्री. एस्. पी. डिसूझा,
सी. आय. डी. च्या डिटेक्शन ऑफ क्राईम ब्रँचचे इ न्स्पेक्टर

सोमवार ता. १७ जून १९५७ या दिवशींची गोष्ट. विधानसभा आणि विधान परिषद या दोहोंचें अधिवेशन त्या दिवशीं चालू होतें. शहराच्या विविध भागांतील संयुक्त महाराष्ट्रवाद्यांची एक प्रचंड मिरवणूक त्या दिवशीं विधानसभेच्या रोखानें निघून सभागृहाबाहेर निदर्शनें करणार होती. या निदर्शकांना आटोक्यांत ठेवण्यासाठीं बृहन् मुंबईतील जवळपास सारें पोलिसदल विधान सभेच्या परिसरांत एकत्र करण्यांत आलें होतें. निदर्शनाच्या ठिकाणीं कुठलाहि अनुचित प्रकार घडूं नये म्हणून सारे वरिष्ठ पोलीस अधिकारी त्या ठिकाणीं हजर झाले होते.

आणि नेमक्या याच दिवशीं पठाणांच्या एका लहानशा टोळीनें भर दिवसा दरवडा घालण्याचें ठरवलें. हा दरवडा पूर्वनियोजित होता आणि पुष्कळ विचारांती त्याची रूपरेखा ठरविण्यांत आली होती.

## दूध पुरवठा योजना

गोरेगांव येथील आरे वाडींत बाटल्यांत बंद केलेलें दूध मुंबई शहरांत वाटण्याची एक योजना मुंबई सरकार चालवितें. दुधाचें वांटप करण्यासाठीं शहराचे वार्ड पाडण्यांत आले असून प्रत्येक वार्डांत बरींच दूधकेंद्रें आणि प्रत्येक दूध केंद्रामागें एक व्यवस्थापक आहे. प्रत्येक केंद्राचा व्यवस्थापक, तें ज्या वार्डमध्यें असेल त्या वार्डाच्या कॅशियरला दूध केंद्रावर गोळा झालेली रक्कम पोंहचवितो. वार्डच्या प्रत्येक गटासाठीं आणखी एक कॅशियर असून त्याचें काम वार्डच्या कॅशियर जवळ गोळा झालेली रक्कम नेण्याचें असतें. वार्डच्या गटाचा कॅशियर दरदिवशीं ही रक्कम गोळा करीत असतो.

## दरवड्याच्या दिवशीं

पश्चिम रेल्वे गटांतील चार वार्डांकरितां श्री. प्रभाकर लक्ष्मण प्रभु हे रक्कम गोळा करणारे कॅशियर होते. गजानन गंगाराम देसाई, हा त्यांचा शिपाई होता आणि दलसिंग दिलबहादूर हा पहारेकरी आणि सेल्वेस्टर जॉन कोहिलो गाडीचा ड्रायव्हर हेहि त्यांच्या बरोबर होते. त्यांची गाडी हिल्मन जातीची होती. आणि तिचा नंबर बी. एम्. एक्स्. ६६२१ हा होता. सकाळीं १०–३० वा हे सर्व लोक आपल्या कामावर निघाले. प्रथम त्यांनीं एकूण सर्व वॉर्डांतील एकूण रकमेच्या नोटांची बंडलें दोन तिजोऱ्यांत ठेवलीं आणि त्या दोन्ही तिजोऱ्या हिल्मन गाडींत ठेवण्यांत आल्या. श्री. प्रभु आणि त्यांचे सहकारी गाडींत बसले आणि गाडी केळेवाडींतून निघाली. श्री. प्रभु आणि त्यांचा शिपाई गाडीतील मागील बाजूच्या सीटवर बसले होते आणि त्यांच्या जवळ तिजोऱ्या होत्या. ड्रायव्हर जवळ दलसिंग दिलबहादूर हा पहारेकरी बसला होता.

मोटार केळेवाडींतून ठाकुरद्वारपर्यंत गेल आणि वळण घेऊन क्वीन्स रोडशीं जोडणाऱ्या रस्त्याने निघाली. आदल्या दिवशीं रविवार असल्यानें त्यादिवशीं श्री. प्रभु यांनीं रक्कम गोळा केली नव्हती. त्यामुळें रविवार आणि सोमवार अशा दोन्ही दिवशींची रक्कम त्या दिवशी गाडींत होती.

सबंध रस्ताभर या गाडीचा पाठलाग पॉंटि आक जातीच्या गाडींतून केला जात होत







आणि तिचा नंबर बी. एम. यू. १४८३ हा होता. याच गाडींत दरवडेखोर होते.

### दरवडेखोरांनी वेळ साधली

उदरहू रस्ता क्वीन्स रोडला जेथें मिळतो तेथें हिलमन वळण घेत असतां पॅांटिआक गाडी एकाएकी मागून पुढें आली तिनें हिलमनचा मार्ग समोरून अडवला. पॅांटिआक थांबली आणि हिलमनलाहि थांबावें लागलें. डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच पॅांटिआक गाडीतील सात जणांपैकीं पांचजण खालीं उतरले आणि त्यांपैकीं एकानें हिलमनचा ड्रायव्हर कोहिलो याला पांच जागीं चाकूनें भोसकलें. बिच्याऱ्याला गाडी मागें घेऊन पळून जावें यांचा विचार करावयास देखील वेळ मिळाला नाहीं. रक्तबंबाळ स्थितींत तो खालीं कोसळला.

प्रभू आणि त्यांच्या जोडिदारांना गुन्हेगारांच्या तावडीतून सुटण्याची मुळींच आशा उरली नाहीं. ड्रायव्हरवर हल्ला चालू असतांनाच चार दरोडेखोरांनी मोटारीला गराडा घातला. त्यांच्यापैकीं एक इसम गुरख्याकडे गेला आणि त्याच्यावर त्यानें लागोपाठ पिस्तुलाच्या तीन गोळ्या झाडल्या. एकानें मोठ्या सुऱ्यानिशीं प्रभूवर हल्ला केला तर दुसऱ्यानें शिपाई गंगाराम देसाई याच्यावर हल्ला केला. ज्या गुन्हेगारानें कॅशिअर प्रभूवर हल्ला केला त्यानें हिलमन मोटारीचा दरवाजा उघडण्याचा प्रयत्न केला. प्रभूनें तो आंतून गच्च धरून ठेवला असल्यामुळें गुन्हेगारांनी त्याच्यावर चाकू हल्ला चालूच ठेवला; अखेर प्रभूचा प्रतिकार कोलमडला आणि दरोडेखोरांनी प्रभूच्या पायाजवळ असलेली कॅशबॉक्स लांबविण्यांत यश मिळविलें. आणि त्याचवेळीं चर्चगेटच्या बाजूनें मंदगतीनें चाललेल्या पॅांटिआक गाडींत जाऊन तो बसला. या कॅशबॉक्समध्यें १४७८४.०९ रु. एवढी रक्कम होती. त्याच्या पाठोपाठ हिलमन मोटारीच्या ड्रायव्हरला ठार मारणारा इसम व गुरख्यावर गोळ्या झाडणारा हे इतर गुन्हेगारहि गेले. हें सर्व घडत असतांनाच गंगाराम देसाईवर हल्ला करणाऱ्या गुन्हेगारानें दुसरी कॅशबॉक्स लांबविली. या कॅशबॉक्समध्यें ६९९७९.६६ रु. एवढी रक्कम होती. त्यानें ही कॅशबॉक्स घेऊन धांवती पॅांटिआक गाडी पकडण्यासाठीं पोबारा केला.

इतक्यांत कॅशिअर प्रभू आणि दलसिंग यांनी हिलमन मोटारीतून बाहेर उडी मारली आणि ते मोठ्यानें "चोर, चोर" असें ओरडले. तें ऐकतांच गंगारामच्या पायाजवळील कॅशबॉक्स पळविणाऱ्या गुन्हेगारानें कॅशबॉक्स रस्त्यावर टाकून पॅांटिआक गांठण्याचा प्रयत्न केला आणि अखेर भयंकर वेगानें चाललेली ती मोटार पकडण्यांत तो यशस्वी झाला. ही गाडी चर्चगेटच्या रोखानें जात होती याचा उल्लेख वर आलाच आहे. पहारेकरी गुरख्याला गोळ्या लागल्या होत्या तरी त्याला धीर येऊन रस्त्यावर पडलेली कॅशबॉक्स घेऊन तो परत हिलमनकडे आला. प्रभूनें नजीकच्या पेट्रोल पंपावर जाऊन पोलिसांना टेलिफोन केला.

### विद्यार्थ्याचें असामान्य प्रसंगावधान

हा दरोडा घातला जात होता त्याचवेळीं रूपारेल कॉलेजमधील बी. ए. च्या वर्गांत असलेले किशोर सुंदर राव नांवाचे एक विद्यार्थी क्वीन्स रोडवरून बसनें चर्चगेटकडे चालले होते. क्वीन्सरोड आणि ठाकुरद्वारच्या कोपऱ्यावरून जातांना त्यांना कसली तरी गडबड आणि गोळीबाराचे आवाज ऐकूं आले. त्यांनी बसच्या खिडकींतून वाकून त्या दिशेकडे पाहिलें तों भरदिवसा हा धाडसी दरोडा घालून दरोडेखोर ज्या पॅांटिआक गाडीतून पळून जात होते ती मोटार त्यांच्या नजरेस पडली. श्री. राव यांनी त्या मोटारीचा नंबर आपल्या मोटार ड्रायविंग लायसेन्सवर टिपून ठेवला आणि लगेच पहिल्या बस स्टॉपवर ते उतरले; लगेच त्यांनी हेड पोलिस ऑफिसमध्यें कंट्रोलरूमवरील ० ० या इमर्जेन्सी टेलिफोनवर टेलिफोन केला.

दरम्यान श्री. प्रभू दरोडा पडलेल्या जागीं परत आले तों प्रिन्सेस स्ट्रीट पोलिस स्टेशनवरील एक अधिकारी तेथें अगोदरच आले असल्याचें त्यांना आढळून आलें. या अधिकाऱ्यानें ड्रायव्हर सेल्व्हेस्टर जॉन कोहिलो आणि पहारेकरी गुरखा दलसिंग दिलबहादुर यांना हॉस्पिटलांत नेलें, तेथें ड्रायव्हर कोहिलो मृत झाल्याचें वैद्यकीय अधिकाऱ्यांनी जाहीर केलें. दलसिंगला सुदैवानें फक्त उजव्या हातावर गोळ्या लागल्या होत्या, तेव्हां त्याला इस्पितळांत ठेऊन घेण्यांत आलें.



अनुक्रमणिका

किशोर सुंदर रावनें तांतडीनें फोन केल्या-मुळें वायरलेस कंट्रोलरूम ऑफिसरनें प्रिन्सेस-स्ट्रीट आणि त्याच्या आजुबाजूच्या पोलिस-स्टेशननां तो संदेश फिरत्या वायरलेस मोटा-रींच्या साह्यानें तावडतोब कळवला आणि मुंबई सी. आय. डी. पोलिसांच्या क्राइम ब्रँचलाहि संदेश पाठविला.

### गुन्ह्याचे जागीं

सी.आय.डी. च्या कचेरींत डेप्युटी कमिशनर श्री. सामी यांना प्रथम ही बातमी कळली आणि त्यांनीं, मी क्राइम ब्रँचच्या डिटेक्शन विभागाच्या व्हॉयोलन्स सेक्शनचा इन्स्पेक्टर आणि क्राइम ब्रँचचा सुपरिंटेंडेंट असल्यामुळें ती बातमी तावडतोब मला कळवली. मी माझ्या विभागांतील होते नव्हते तेवढे सारे अधिकारी गोळा केले आणि आम्हीं तावड-तोब गुन्ह्याचे जागीं रवाना झालों. आम्ही सुमारें ३ वाजतां तेथें पोहोचलों. प्रिन्सेस स्ट्रीट पोलिस स्टेशनचे अधिकारी यावेळीं प्राथमिक चौकशीचें काम करीत होते.

बी. एन्. एक्स. ६६२१ ही हिलमन मोटार अजून तेथेंच होती. मोटारींत आणि खालीं बरेच रक्त सांडलेलें होतें. जवळच रस्त्यावर काडतुसांची दोन केसिंग पडलेली आढळलीं. त्यावर आर इ. एम. यु एम सी २५,६.३५ एम एम असा छाप होता. तथापि पहारेकरी गुरख्यावर दरोडेखोरांनीं झाड-लेल्या गोळ्या मात्र खूप तपास करूनहिं दुर्दैवानें मिळाल्या नाहींत. रक्त गोठून जावें अशी ही विलक्षण धाडसी दरोडेखोरीची घटना होती. आणि त्यांत एकाचा मुडदाहि पडला होता. सबंध शहरभर ही बातमी वाऱ्याप्रमाणें पसरली. या योजनाबद्ध दरो-ड्याची बातमी ऐकून सबंध शहराला जबर-दस्त धक्का बसला. ही सारी घटना क्षणार्धांत घडली आणि त्यावेळीं रस्त्यावरून जाणाऱ्या येणाऱ्या लोकांनाहि आपल्या डोळ्यांदेखत ही घटना घडत असल्याचें समजलें नाहीं.

आम्हीं घटनास्थळीं पोहोचलों तोपर्यंत शिपाई गंगाराम, देसाई आणि कॅशिअर श्री. प्रभू तेथेंच होते. श्री. प्रभू यांनी यावेळ-पर्यंत आपल्या मनाचा तोल सावरला होता. त्यांना मी कांहीं प्रश्न विचारले.

दरोडेखोरांचें वर्णन पूर्णपणें लक्षांत घेणें हा माझा पहिला हेतु होता. पहारेकरी गुरख्याला ज्याने गोळी घातली त्या इसमाला ह्या व्यक्तीने चांगल्याप्रकारें पाहिलें, असें त्याच्या बोलण्या-वरुन कळून आलें होतें. गुन्हेगारांच्या कार्य-पद्धतीबद्दल मी पूर्ण माहिती काढली होती आणि कमींत कमी एका दरवडेखोराच्या तरी अगदीं बिनचूक वर्णनाची मला आवश्य-कता होती.

### अचूक अंदाज

या गुन्ह्याचें सिंहावलोकन करीत असतां माझें लक्ष, ७ जून १९५० रोजीं वरील गोष्टी-प्रमाणेंच एका मोटारीवर हल्ला करण्यांत आला होता, त्या प्रकाराकडे वेधलें जात आहे. मुंबई येथील हायकोर्टाजवळील मेयो रोडवर बी. ई. एस. टी. ची कॅश नेणाऱ्या मोटारीवर हल्ला करण्यांत आला होता. हल्ला करणाऱ्यां-पैकीं एका दरवडेखोराचें व्यवस्थित वर्णन माहीत करून घेतल्यानंतर दिलवरखान मिर-सलामखान याची आकृति स्पष्टपणें माझ्यासमोर उभी झाली व त्याचें मला एकाएकीं स्मरण झालें. हा इसम सरहद्द प्रांतांतील एक पठाण होता व त्यानेंच दि. ७ जून १९५० रोजीं सकाळीं बी. ई. एस. टी. ची कॅश नेणाऱ्या मोटारीवर दरोडा घालण्याचा कट रचला होता. त्याला दि. २० डिसेंबर १९५० रोजीं, सेशन्स कोर्टनें इंडियन पिनल कोडच्या कलम ३९२ आर. । डब्ल्यु ३४ खालीं पांच वर्षें सक्त मजुरीची शिक्षा दिली होती. १९५५ मध्यें त्याची कारागृहांतून मुक्तता करण्यांत आली. कॅशियर प्रभूनें जें वर्णन सांगितलें तें दिलवरखानच्या आकृतीशीं इतकें जुळलें कीं, त्यामुळें मी त्याच्या शोधांत निघालों.

दरम्यानच्या काळांत, प्रिन्सेस स्ट्रीट पोलीस स्टेशन व गुन्हेगाराचा शोध लावणारी शाखा येथील अधिकाऱ्यांनी, बी. एम्. यू. १४८३ ही पाँटिआक गाडी हुडकून देण्याबाबत एकत्रित प्रयत्न केला. मालकाचें नांव व त्याचा पत्ता मिळविण्याचे काम कांहीं अधि-काऱ्यांना सांगण्यांत आलें. त्या मोटार माल-काचा शोध लावण्यांत आला आणि दरवडे-खोरांनी नंबराच्या खोट्या प्लेटस् वापरल्या होत्या असें कळून आलें. कारण, बी. एम्. यू. १४८३ नंबरची मोटार परळ येथील एका गॅरेजमध्यें असल्याचें आढळलें व त्या गाडीचा रंग दरोडेखोरांनीं उपयोगांत आणलेल्या निळ्या रंगाच्या पाँटिआक गाडीच्या रंगा-सारखा नव्हता म्हणून दरवडेखोरांनी उपयोगांत आणलेली गाडी त्यांनी कोठून तरी चोरून आणलेली होती, हें आतां स्पष्ट झालें होतें.

### पाठलाग

दिलावरखानचा तांतडीने तपास लावणें हें माझें सर्व प्रथम कार्य होतें आणि त्याकरितां मी इतर अधिकाऱ्यांबरोबर शहरांत फिरलों. दिदारखान नामदारखान नांवाचा एक पठाण बी. ई. एस. टी. च्या कॅश नेणाऱ्या मोटारी-वरील हल्ल्यांत दिलावरखान बरोबर होता; त्याचा शोध लावण्यांत आम्हांला यश लाभलें. दीदारखान नामदारखानालाहि या खटल्यांत सात वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा देण्यांत आली होती व नंतर त्याची कारा-गृहांतून मुक्तता करण्यांत आली होती. परंतु त्याने त्यानंतर फोर्ट विभागांत लिफ्टमनची नोकरी धरून जीवनांत एक नवीन पेशा स्वीकारला होता. त्याला विश्वासांत घेतलें असतां त्याने असें सांगितलें कीं, दीलावरखान हा मुंबईत असून त्याच्याजवळ एक पिस्तूल आहे. २५ कॅलियरच्या काडतुसाच्या रिकाम्या केसिंग्ज हातीं लागल्यामुळें आमची शंका बळावली व दिलावर खानचा शोध लावण्या-करितां शिकस्तीचे प्रयत्न करण्यांत आले. कित्येक पठाणांकडे विचारपूस करण्यांत आली पण तो कोठें मिळेल हें आम्हांला कुणीही सांगूं शकलें नाहीं. त्यावेळीं श्री. सामी, गुन्हे-खात्यांत डी. सी. पी. या हुद्यावर होते व त्यांनी पूर्वी या प्रकारच्या गुन्हेगारांचा शोध लावला होता. त्यांनी मला शक्य त्या सर्व सूचना दिल्या आणि हें सर्व काम माझ्या सारासार बुद्धीवर व प्रेरणेवर सोंपविलें.

त्याच रात्रीं अंदाजें रात्रीं ९ वाजतां शिवाजी पार्क येथें राहत असलेले श्री. किशोर सुंदर

स्वातंत्र्यदिन : १९५९



अय्या! मंदा 'लाईट' छान आहे नाहीं!

राव यांची, त्यांच्या निवासस्थानीं मी भेट घेतली व त्यांची जबानी घेतली. या तरुणानें सुदैवाने त्या पॉंटिआक मोटारीचा नंबर टिपून घेतला होता व त्यानें तिचें वर्णन त्याच्या मोटारच्या लायसेन्सच्या मागें लिहून ठेवलें होतें. मी त्यांच्याकडे नम्रपणें त्यांचें ड्रायव्हिंग लायसेन्स मागितलें. आपल्याला त्याची आवश्यकता असल्याचें सांगून त्यांनी त्या गोष्टीला नकार दिला. तथापि मी त्या लायसेन्सची नक्कल केली व त्यांचें लायसेन्स त्यांना परत केलें.

### तपासाचें काम मर्यादित झालें

बी. ई. एस. टी. ची कॅश नेणाऱ्या मोटारीवर हल्ला करणाऱ्या दिलावरखानच्या सोबत्यांकडून किंवा त्याच्या मित्रांकडून त्यांचा तपास लावणें हें माझें त्यानंतरचें काम होतें. दिदारखान हा त्याचा जुना मित्र होता परंतु तो आम्हांला त्याचा नक्की पत्ता देऊं शकला नाहीं. परंतु त्यानें त्याला मुंबईत पाहिलें होतें व त्याच्याजवळ पिस्तूल होतें असें आम्हांला कळलें; माझ्या ओळखीच्या इतर लोकांकडून असें कळलें कीं, तो एकतर फोर्ट विभाग किंवा जेकब सर्कल येथें राहत असावा. दिलावरखान दिवसा किंवा रात्रीं तीन ठिकाणीं भेट देत असतो, असें समजलें. कुलाबा हें पहिलें, फोर्टमधील कावसजी पटेल स्ट्रीट हें दुसरें व जेकब सर्कलजवळील आग्रिपाडा भागांतील पत्रा चाळ हें तिसरें ठिकाण होतें.

अंदाजें रात्रीं बारा वाजतां मला ही बातमी लागली. माझ्या हाताखालील सर्व अधिकाऱ्यांना व इसमांना मी एकत्र जमविलें आणि या तीनही ठिकाणीं अहोरात्र पहारा ठेवण्याची व्यवस्था केली.

मी स्वतः कावसजी पटेल स्ट्रीटवर पहारा करण्यासाठीं उभा राहून दुसऱ्या दोन्हीं ठिकाणीं वारंवार जाऊन; अधिकारी व संबंधित लोकांशीं संपर्क ठेवला. ज्या ठिकाणीं आम्हांस शक्य होतें त्या ठिकाणीं आम्ही मजूर, चहावाला आणि बूट पॉलीसवाल्याचे वेष केले. दुर्दैवानें आमच्यापैकीं फक्त आम्हीं चारजणच दिलावरखानला सहज ओळखूं शकत होतों. त्यापैकीं पी. ए. नं. ४८४२/के शंकर हरी जाधव आणि दुसरा पी. ए. नं. ४१६५/के शेख उस्मान दादामिया हे दोघे कॉन्स्टेबल होते. अधिकाऱ्यांपैकीं मी आणि सब इन्स्पेक्टर श्री. बी. आर. जाधव असे दोघेच होतों. म्हणून मी दुसरे अधिकाऱ्यांसह पी. एन. ४१६५/के यांस जेकब सर्कल येथें, तर सब इन्स्पेक्टर जाधव यांना कुलाबा येथें आणि पी. एन. ४८४२/के यांस कावसजी पटेल स्ट्रीट, फोर्ट येथें नियुक्त केलें. ता. १७ व १८ जून १९५७ रोजीं संबंध रात्रभर याठिकाणीं कडक नजर ठेवली तरी दिलावरखानचा तपास लागला नाहीं. तरीपण अधिकारी आणि इतर माणसांना कांहीं झालें तरी शिथिलता येऊं देऊं नका म्हणून मी धीर दिला.

### सतत पहारा

ता. १८ जूनच्या अगदीं सकाळीं माझ्या फिरण्यामुळें मला असें वाटलें कीं, त्या दिवशीं केव्हांहि अथवा रात्रीं दिलावारखान कावसजी पटेल स्ट्रीटला भेट देईल; म्हणून मी कावसजी पटेल स्ट्रीट वरील पहारा वाढविला. अधिकारी आणि माणसांना झोंप नव्हती अथवा त्यांनी जेवणहि घेतलें नव्हतें. त्यांची कर्तव्य तत्परता अशी होती कीं, त्यांना ज्या ठिकाणीं बसविलें होतें तेथून ते इंचभर देखील सरले नसते. संबंध रात्र आणि दिवसभर आमचा ज्या कावसजी पटेल स्ट्रीटवर पहारा होता, तेथून अगदी दोन फर्लांग अंतरावर फोर्टमध्यें असलेल्या स्टोअर लेनमध्यें सायंकाळीं सु मारें ४ वाजतां बी. एम. यू. १४८३ ही पॉंटिआक मोटार आम्हाला आढळली.

त्याचक्षणीं हाताचे ठसे तज्ज्ञ श्री. कुमार यांना बोलविण्यांत आलें. आणि त्यांनी त्या बाबत बरेच श्रम घेतले तेव्हां पॉंटिआक मोटारीच्या आंत व बाहेरच्या बाजूस १८ 'चान्स प्रिन्टस्' आढळून आले.

### चिकाटीला आलेलें यश

पॉंटिआक मोटारींच्या शोधामुळें आमची आशा अधिकच बळावली. आम्हीं जरी थकलों अथवा दमलों होतों तरी मी कावसजी पटेल स्ट्रीटवरील पहारा शक्य तितका कडक करण्याचा विचार केला. ता. १८ जून रोजीं रात्रीं सुमारें ८—२० वाजतां दैवाने आम्हांस हात दिला आणि हें बिकट काम पूर्ण झालें. त्याचवेळीं फिरोझशहा मेहता रोडवरून कावसजी पटेल स्ट्रीट व सर फिरोझशहा मेहता रोड स्टॉपच्या कोपऱ्यावर एक टॅक्सी येत असलेली आम्हांस दिसली. टॅक्सीतून कोण उतरलें असें तुम्हांला वाटतें ? तो आम्हां सर्वांना पारशी माणसाप्रमाणें वाटला. त्यानें पांढरा सदरा आणि वूलनची पॅन्ट घातलेली होती. याशिवाय, त्यानें आपली ओळख पटूं नये म्हणून गॉगल घातलेला होता हें स्पष्टपणें दिसत होतें. टॅक्सीवाल्यास पैसे दिल्यावर कावसजी पटेल स्ट्रीटवरून तो तडक शेरी हौसकडे निघाला. मी संबंध दिवसभर शेरी हौसवर नजर ठेविली होती. त्याच्या चालण्यावरून नि पोषाखावरून तो दिलावरखानच आहे हें मी आणि पोलीस नाईक जाधवनीं ओळखलें.

दुर्दैवानें त्यावेळीं रस्ता नेहमीप्रमाणें निर्जन होता. त्याला यत्किंचितहि संशय न येतां कसें पकडावें याबद्दल मला कांहीं सुचेना त्यावेळीं मी शेरी हाऊसच्या प्रवेशद्वाराजवळच होतों, परंतु मी टेलिफोनच्या खांबाला टेकून रस्त्याकडे पहात होतों. मी त्यास प्रवेशद्वारापर्यंत जाऊं दिलें. आणि तो शेरी हौसमध्यें प्रवेश करणार तोंच मी मागून जाऊन त्याच्या कमरेस मिठी मारून त्याचे हात पकडले.

### अखेर तावडीत सांपडला

त्यानें आपल्या विजारींत हात घालून खिशांतून कांहीं तरी काढण्याचा बराच प्रयत्न केला. डेप्युटी इन्स्पेक्टर दक्षिणकर, सब इन्स्पेक्टर पटेल आणि हेड कॉन्स्टेबल सुर्वे हे सर्वजण तावडतोब माझ्या मदतीस आले नि आम्हीं सर्वांनी त्यास पकडलें. तो आपल्या पॅन्टच्या खिशांमधून कांहींहि काढूं शकला नाहीं अथवा निष्फळ नि जोरदार धडपड करून आमच्या तावडीतून सुटूंहि शकला नाहीं!

रस्त्यावर तावडतोब फार मोठी गर्दी जमली. सुदैवानें शेरी हौसच्या रस्त्यावर एक सायकल दुकानवाला होता. मी त्याला, तसेंच रस्त्यावर जमलेल्यांपैकीं एका इसमाला पंचनाम्यासाठीं साक्षीदार म्हणून बोलाविलें. मी पंचादेखतच दिलावरखानची झडती घेतली. झडतींत मला त्याच्याजवळ काय सांपडलें ? त्याच्याजवळ पिस्तूल मिळेल अशीच माझी अपेक्षा होती. आणि झडतींत मला पांच जिवंत काडतुसें असलेलें. २५ कॅलिबरचें पिस्तूल मिळालें. यासाठींच त्याला कसें पकडावें याचा मी विचार करीत होतों. या काडतुसांपैकीं तीन काडतुसें, गुन्ह्याच्या जागी सांपडलेल्या काडतुसांच्या म्हणजे रेम. यू. एम्. सी मॅन्युफॅक्चर मेकचींच होतीं. याशिवाय

त्याच्याजवळ स्वतःचे १२० रुपये होते. सर्व सामानाचा पंचनामा केल्यानंतर दिलावरखाननें जाणलें कीं, खेळ खलास झाला. दरोड्याबद्दलची सविस्तर माहिती तेथल्या तेथें देण्याची त्यानें तयारी दर्शविली. परंतु त्याची हकिकत ऐकण्यास ती जागा योग्य नव्हती म्हणून मी त्यास सर्व हकिकत सी. आय. डी. ऑफिसमध्यें सांग असें म्हणालों. दोन्हीं पंच साक्षीदारांनाहि आमच्या बरोबर सी. आय. डी. ऑफिसमध्यें येण्यास मी विनंती केली.

### दिलावरखानचा कबुलीजबाब

दिलावरखान मिरअस्लामखानला पकडल्याची बातमी मी ताडतोब श्री. सामी यांना कळविली. ते तडक ऑफिसमध्यें येऊन दाखल झाले. त्यावेळचे दक्षिण विभागाचे डेप्युटी कमिशनर ऑफ् पोलिस इनचार्ज श्री. लोबो हेहि त्यांच्या पाठोपाठ येऊन दाखल झाले. या दोघांनीहि दिलावरखानला प्रश्न विचारले आणि त्यानीं देखील दरोड्याचा व्यूह आपण रचल्याचें आणि त्याकामीं (१) क्लेअर रोडवर राहणारा ख्रिश्चन गृहस्थ पेट्रिक, (२) अरबशाह, (३) जमशेद, (४) सय्यदखान, (५) गुलामखान (हे सर्वजण पठाण) आणि लॅमिंग्टन रोडवर राहणारा एक हिंदू या सहकाऱ्यांची या कामीं मदत घेतल्याचें कबूल केलें. तसेंच पॅट्रिकचें घर दाखवितों असेंहि त्यानें स्वखुषीनें सांगितलें.

नंतर मी त्याला क्लेअर रोडला घेऊन गेलों. सुदैवाने पॅट्रिक रोझॅरिओ डिसूझा हा आंतल्या खोलीच्या अगदी जवळच लागून बसलेला आढळला. दिलावरखानने त्यास बाहेर बोलाविलें व मी त्यास ताबडतोब पकडून सी. आय. डी. ऑफिसमध्यें आणलें.

सी. आय. डी. ऑफिसमध्यें मी पॅट्रिकला तपासणीसाठीं इन्स्पेक्टर मोकाशी व सब् इन्स्पेक्टर पटेल यांच्या हवालीं केलें. मी स्वतः दिलावरखान याला डेप्युटी इन्स्पेक्टर दक्षिणकर व सब इन्स्पेक्टर जाधव यांच्या मदतीने प्रश्न विचारले. दिलावरखानने, फोडलेली कॅशबॉक्स आपण शेरी हाऊसमधील संडासाच्यावर फेकली असल्याचें दोन पंचासमोर सांगितलें. शेरी हाऊसचा पठाण वॉचमन खुबगुलखान याला आपण ४,००० रुपये दिले असून त्याची खोली शेरी हाऊसच्या गच्चीवर आहे असेंहि तो म्हणाला.

मी त्याची ही जबानी ताबडतोब पंचनाम्यांत लिहिली व पैसे आणि फोडलेली कॅशबॉक्स मिळविण्यासाठीं बाहेर पडलों. दिलावरखानाच्या जबानीवरुन असें दिसून आलें कीं तो व त्याचे साथीदार हल्ल्यानंतर ताबडतोब खुबगुलखानच्या खोलीवर गेले, तेथें त्यांनी खुबगुलखानाच्या समोर कॅशबॉक्स फोडली; लुटीचा पैसा आपसांत वाटून घेतला व नंतर ते निरनिराळ्या दिशेनें पसार झाले.

### कॅशबॉक्स मिळविली

दिलावरखानला घेऊन मी शेरी हाऊसमध्यें पोहोंचलों तेव्हां रात्रीचे ९-३५ झाले होते. त्यानें आम्हांला तळमजल्यावरील संडासकडे नेलें व संडासाच्यावरून कॅशबॉक्स काढली. कॅशबॉक्सचें झांकण बळजबरीनें उघडल्याचें दिसत होतें. मी ती आपल्या ताब्यांत घेऊन पंचनाम्यांत त्यासंबंधीं नोंद केल्यानंतर त्यानें

आम्हांस खुशगुलखानाकडे नेलें. तो त्यावेळीं घरींच होता.

दिलावरखानाला पोलिसांच्या ताब्यांत पाहून त्याला आश्चर्य वाटलें. दिलावरखानच्या विनंतीवरून त्यानें ताबडतोब आपल्या तिजोरींतून एक कापडाची थैली काढून दिली. या थैलींत १ रुपयाच्या सरकारी नोटांचीं ४१ पुडकीं होतीं व प्रत्येक पुडक्यावर वरच्या व खालच्या बाजूस पश्चिम रेल्वे गटाच्या निरनिराळ्या दूध केंद्रांच्या वार्ड ऑफीसचे रबर स्टँप मारलेले होते. यामुळें लुटल्या गेलेल्या मालमत्तेची ओळख स्पष्टपणें पटली. पुढें खटल्याचे वेळीं वार्ड कॅशिअरनें आपल्या साक्षींत तसेंच सांगितलें. मी नोटा ताब्यांत घेऊन त्यांचा पंचनामा केला. एकूण रक्कम ४०९६ रुपये होती.

### आणखी नोटा

दरम्यान, दरवडेखोर पॅट्रिक याची इन्स्पेक्टर मोकाशी व सबइन्स्पेक्टर पटेल यांनी झडती घेतली तेव्हां त्याच्याजवळ १ रुपयाच्या ९५ नोटा सांपडल्या. यापैकीं तीन नोटांवर पीए वॉर्ड ऑफिसचा शिक्का होता. पॅट्रिकच्या जबानीप्रमाणें इन्स्पेक्टर मोकाशी व इन्स्पेक्टर पटेल हे डेप्युटी कमिशनर सामी व सुपरिंटेंडेंट कोरडे व भागवत यांच्या समवेत भायखळ्यामधील क्लेअर रोडवरील अंडरटेकरच्या दुकानांत गेले. तेथें पॅट्रिकनें वरच्या माळ्यावरून नोटांचें एक पुडकें काढलें. तें पुडकें सोडल्यावर त्यांत १ रुपयाच्या नोटांचीं १५ पुडकीं आढळून आलीं. नोटांच्या प्रत्येक पुडक्याच्या खालच्या व वरच्या बाजूवर पश्चीम रेल्वे गटाच्या निरनिराळ्या कचेऱ्यांचे शिक्के मारलेले होते. येथें सुद्धां पळविलेल्या नोटांची ओळख स्पष्टपणें पटली. इन्स्पेक्टर मोकाशी यांनी नोटा ताब्यांत घेतल्याबद्दलचा पंचनामा लिहिला व ते सी. आय. डी. ऑफिसमध्यें परत आले. तेथें त्यांनी त्या नोटा व पॅट्रिक याला माझ्या ताब्यांत दिलें.

हा मध्यरात्रीचा सुमार होता. ता. १७ जूनपासून आमच्यापैकीं कुणाचाहि डोळा लागला नव्हता किंवा कॉफी अथवा चहा याशिवाय आम्ही दुसरें कांहीं खाल्लेंहि नव्हतें.

आतां आमच्यापुढें, उरलेल्या दरवडेखोरांचा तपास लावण्याची सर्वांत कठिण कामगिरी होती. या दरवडेखोरांपैकीं एकानें ड्रायव्हर कोहेलो याला ठार केलें होतें. आम्हीं थोडा वेळ विश्रांति घेऊं शकलों असतों. पण आम्हीं तसें केलें नाहीं. फरारी दरवडेखोरांचा तपास लावण्याच्या दृष्टीनें दिलावरखान व पॅट्रिक यांना प्रश्न विचारण्याचें आम्हीं ठरविलें. मी दिलावरखानावर सतत प्रश्नांचा भडिमार केला. आमच्या प्रश्नांचा ताण तो सहन करूं शकला नाही व त्याने अरबशाह व जमशेद यांच्या राहण्याच्या जागा आम्हांस दाखविण्याचें कबूल केलें. ते तेथें सांपडतील कीं नाहीं याबद्दल मात्र त्याची खात्री नव्हती. तो आम्हांला हेन्स रोडवरील आग्रीपाड्यामध्यें पत्रा चाळींत घेऊन गेला. परंतु अरबशाह व जमशेद हे ता. १७ जूनच्या सकाळीं ९ वाजल्यापासून तेथें आले नव्हते. मी तेथें त्यांच्या पाळतीवर सी. आय. डी. च्या कांहीं माणसांना ठेऊन दिलावरखान व पॅट्रिक यांना घेऊन निघून गेलों.

### झोपेंत असतांना पकडलें

तेथून निघाल्यानंतर आम्हीं आमचे दोन गट केले. मी दिलावरखानला माझ्याबरोबर घेतलें. व पॅट्रिकला माझे सहकारी इन्स्पेक्टर मोकाशी यांच्या स्वाधीन केलें. दिलावरखानं मला फोरास रोडच्या भागांत, आंत ज्या ठिकाणीं मुंबई इम्प्रुव्हमेंट ट्रस्टच्या चाळी आहेत तेथें घेऊन गेला. तेथें गेल्यावर त्याचा दरोड्यांतील साथीदार सय्यदखान हा त्यापैकीं कोणत्या खोलींत राहतो हें आपल्यास नक्की माहीत नाही असें तो म्हणाला; पण १३ नंबरची चाळ दाखवून तो त्या चाळींतून नेहमी येत असल्याचें आपण पाहात होतों असें त्यानें सांगितलें. मी संपूर्ण चाळीला गराडा घालून प्रत्येक खोली तपासण्याचें ठरविलें. तेथील प्रत्येक चाळींत ८० खोल्या आहेत व प्रत्येक खोलीची आम्हांस काळजीपूर्वक झडती घ्यावयाची होती.

चाळीला गराडा घातल्यानंतर मी दिलावरखानला घेऊन आंत गेलों आणि तेथें झोपलेल्या प्रत्येक इसमाच्या चेहऱ्याकडे काळजीपूर्वक पाहूं लागलों. अशा रीतीनें नंबर ३ च्या खोलीमध्यें आम्हीं आलों असतां तेथें सय्यदखान गाढ झोपेंत असलेला आम्हांला आढळला. ह्या खोलीचीं दारें उघडींच होतीं. कदाचित् उकाडा होत असल्यामुळें तीं उघडीं ठेवलीं असावींत. सय्यदखानला पाहिल्यावर दिलावरखाननें माझ्याकडे पाहून मान हलविली. मी ताबडतोब दिलावरखानला घेऊन जाण्यास सांगितलें व त्याला वेगळ्या गाडींत ठेवण्याची सूचना केली. हेतु हा कीं, दिलावरखान तेथें आहे हें सय्यदखानास कळूं नये.

मी सय्यदखानला झोपेंतून उठविलें व बाहेर आणलें. कोणत्याहि प्रकारचें बेकायदेशीर कृत्य केल्याचा त्यानें जोरदार इन्कार केला. त्यानंतर मी दिलावरखानला त्याच्या समोर आणलें. त्यानंतर मात्र तो सरळ आला व त्यानें आपला हिंदु सहकारी दाखविण्याचें कबूल केलें. अरबशाह व जमशेद हे कुठें पसार झाले हें मात्र आपणास माहित नाहीं असें त्यानें सांगितलें.

सय्यदखानानें आम्हास फोरास रोडपासून दोन फर्लांगावर असलेल्या लॅमिंग्टन रोडवरील एका जागीं आणलें. तेथें फूटपाथवर झोपलेल्या अनेक लोकांमध्यें त्यांचा हिंदु साथीदार होता. त्याला झोपेंतून उठविल्यानंतर आपलें नांव विजयचंद्र ठाकूर असल्याचें त्यानें सांगितलें व सय्यदखानला पोलिसांच्या ताब्यांत पाहून आपणहि दरोडेखोरांपैकीं एक असल्याचें कबूल केलें.

त्याची झडती घेतल्यावर त्याच्याजवळ एक रुपयाच्या २३९ नोटा सांपडल्या. यापैकीं चावीस नोटांवर पश्चिम रेल्वे गटाच्या निरनिराळ्या कचेऱ्यांचे शिक्के होते. त्याच्याजवळ आणखी ५५ रु. ची रक्कम होती. तसेंच एक नवीन रिस्टवॉच व तें विकत घेतल्याची १८ जून १९५७ ची पावतीहि त्याच्याजवळ सांपडली. रक्कम, रिस्टवॉच व पावती ही बरोबर जुळत होती. ही वेळ १९ जून ची पहांटे ५ वाजतांची होती.

स्वातंत्र्यदिन : १९५९



यंदा कांहीं जमलें नाहीं बुवा !

- या नंतर सय्यदखानला प्रश्न विचारण्यासाठीं व त्याचा दरोड्यांतील हिस्सा हस्तगत करण्यासाठीं आम्हीं सी. आय. डी. ऑफिसमध्यें परत आलों. बऱ्याच वेळानंतर त्यानें आपला हिस्सा कोठें पुरून ठेवला हें दाखविण्याचें कबूल केलें. त्यानें आम्हांस क्लेअर रोडवरील रॉजर्स एरेटेड वॉटर फॅक्टरीच्या आवारांतील आपल्या चुलत्याच्या खोलीमध्यें नेलें. त्यानें खोलींतील जमीन खणून ॲल्युमिनियमचें एक भांडें काढलें. या भांड्यांत आम्हांला १ रुपयाच्या नोटांचीं १३ पुडकीं मिळालीं. एकूण रक्कम १,२६९ रु. होती. फक्त एकाच नोटेवर पी ए वॉर्ड ऑफिसचा शिक्का होता. स्टँप मारलेल्या बहुतेक सर्व नोटा आपण विजयचंद्र ठाकूरला दिल्याचें सय्यदखाननें नंतर सांगितलें. अशा प्रकारें १९ जूनला सकाळीं ७ पर्यंत आम्हीं दरोडेखोरांपैकीं चार जणांना अटक केली व दरोड्यांतील ७,३६७ रुपयांची रोख रक्कम वसूल केली.

मिळालेल्या यशानें मोहित न होतां आम्हीं सर्वांनी फरारी दरोडेखोरांचा तपास लावण्याचें काम तसेंच जारी ठेवलें. दिलावरखान आणि पॅट्रीक यांनीं सांगितलेल्या जागांची कसून झडती घेतली. चौकशीअंती अरबशाह आणि जमशेद ह्या दोघांनी मुंबई सोडल्याचें दिसून आलें.

अरबशाह आणि जमशेद यांचा माग काढण्यासाठीं कांहीं अधिकाऱ्यांची आणि इतर लोकांची नेमणूक केल्यावर मी दिलावरखान आणि पॅट्रीकबरोबर सी. आय. डी. ऑफिसमध्यें परत आलों. असें करण्यांत माझा उद्देश दुहेरी होता. मला, साक्षीदारांना ऑफिसमध्यें बोलावयाचें होतें आणि ऑनररी प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटतर्फे घेण्यांत येणारी "ओळख" परेड घ्यावयाची होती; आणि दुसरें म्हणजे दिलावरखान यास अरबशाह हा मुंबई सोडून इतर कोणकोणत्या ठिकाणीं जाण्याची शक्यता आहे हें विचारावयाचें होतें.

मॅजिस्ट्रेटने घेतलेल्या "ओळख" परेडमध्यें कॅशिअर प्रभू याने दिलावरखान आणि पॅट्रिक यांना ओळखलें, त्याने विजयचंद्र ठाकूर यास पण ओळखलें. गुरख्यावर ( वाचमन ) बंदूक चालविलेला दरवडेखोर म्हणून दिलावरखान यास ओळखलें तर पेट्रीक यास "कॅश बॉक्स" चोरणारा आणि सुऱ्यानें इजा करणारा म्हणून आणि विजयचंद्र ठाकूर यास पॉंटिआक मोटर गाडींत बसलेला इसम म्हणून ओळखण्यात आले. दुसरा साक्षिदार शिपाई गंगाराम यानें ड्रायव्हर कोहेलो याला गोळी घालून मारणाऱ्या दरोडेखोरावर लक्ष ठेवणारा म्हणून सय्यदखानला ओळखलें.

सर्व दरोडेखोरांचे बोटांचे आणि तळहातांचे ठसे मी फिंगरप्रिंट ब्यूरोकडे पाठविले. यापैकीं पॉंटिआक मोटारीवरील तळहाताचा ठसा हा विजयचंद्र ठाकूरच्या डाव्या तळहाताच्या ठशाबरोबर जुळता होता. बाकीचे ठसे ओळखतां आले नाहींत.

दिलावरखानाची कसून तपासणी केल्यावर अरबशाह याची एक बाई कुलाबा येथें असल्याचें समजलें. परंतु ती जानेवारी १९५७ मध्यें कलकत्त्यास गेली होती. तिचे नांव आणि कलकत्ता येथील तिचा पत्ता मिळविल्यावर क्राईम ब्रँच सी. आय. डी. विभागाचे सब-इन्स्पेक्टर श्री. साने यांना कांहीं माणसांबरोबर कलकत्त्यास पाठविलें. श्री. साने यांना त्यांच्या कामांत यश न आल्यामुळें ते निराश होऊन मुंबईला परत आले.

## पुन्हां कलकत्ता

हवी असणारी माहिती न मिळाल्यामुळें श्री. साने जरी मुंबईला आले तरी मी आणि माझ्या वरच्या अधिकाऱ्यांनीं डेप्युटी कमिशनर श्री. सामी यांच्या मार्गदर्शनाखालीं अरबशाह आणि जमशेद या दोघांचा शोध लावण्याचें काम सतत चालू ठेवलें. ह्या लोकांनी फरारी व्हावें ही आमच्या दृष्टीनें चांगली गोष्ट नव्हती. पॉंटिआक मोटार गाडीवरील न ओळखलेले ठसे हे अरबशाह किंवा जमशेद यांच्यापैकी एकाचे तरी असावेत याबद्दल आम्हांला खात्री होती.

शेवटीं ता.६ जुलै १९५७ रोजीं अरबशाह आणि जमशेद हे दोघे कलकत्त्यास असल्याबद्दलची माहिती डेप्युटी कमिशनर श्री. सामी यांना मिळाली. त्याच दिवशीं मला अरबशाह आणि जमशेद या दोघांनी ता.१७ जूनला मुंबईहून कलकत्त्यास प्रयाण केल्याचें समजलें. डेप्युटी कमिशनर सामी यांनीं तावडतोब दोन अधिकाऱ्यांना आणि कांहीं माणसांना कलकत्त्यास पाठविलें. यानंतर मी लगेच डेप्युटी इन्स्पेक्टर दक्षिणकर आणि सब-इन्स्पेक्टर जाधव यांची आणि सी. आय. डी. विभागांतील ४ अत्यंत विश्वासू इसमांची या कामासाठीं नेमणूक केली.

ही सर्व मंडळी ता. ८ जुलै रोजीं सकाळीं कलकत्त्यास जाऊन पोहोंचली. आणि त्यांनीं आपलें बस्तान हौरा रेल्वे स्टेशनमधील दुसऱ्या वर्गाच्या विश्रामगृहांत ठेवलें. स्टेशनच्या बाहेर न जातां त्यांनीं बातमीदारास अरबशाहबाबत माहिती काढण्यासाठीं पाठविलें. त्या दिवशीं दुपारपर्यंत कांहींच पत्ता लागला नाहीं. संध्याकाळीं बातमीदारानें चांगली नवी बातमी आणली. त्यानें आणलेल्या माहितीनुसार अरबशाह आणि जमशेद यांनीं तारीख २६–६–५७ रोजीं कलकत्ता सोडल्याचें व ते लखनौकडे गेल्याचें आणि ता. ९ जुलैची ईद साजरी करण्यासाठीं परतणार असल्याचें समजलें. तेव्हां ता. ८ जुलैच्या रात्रीपासून कलकत्त्यास येणाऱ्या प्रत्येक गाडीवर दोन अधिकारी आणि इतर माणसांनीं पाळत ठेवली.

दिवस उजाडला तरी अरबशाह किंवा त्याचा सोबती यापैकीं एकाचाहि पत्ता लागला नाहीं. यामुळें दोन्ही अधिकारी निराश झाले. सकाळची ७ ची वेळ होती. सी. आय. डी. अधिकारी आणि इतर लोकांना झोंप मिळाली नाहीं.

## संशयीत प्रवासी

इतक्यांत नीट नेटके कपडे केलेले दोन गृहस्थ विश्राम गृहांत ( वेटींग रूम ) आले त्यांच्याजवळ नवीन "सूट केसेस" आणि "हँड बॅगा" होत्या. तोंड धुतल्यावर कपडे बदलण्यासाठीं त्यांची गडबड चालली होती. त्यांच्या चेहऱ्यावरील हावभाव आणि अधिकाऱ्यांकडे असलेल्या वर्णनावरून या दोघांपैकीं एक अरबशाह असावा असा संशय दोन्ही अधिकाऱ्यांना आला. ते त्यांच्याजवळ गेले आणि त्यांनीं त्यांना प्रश्न विचारले त्याबरोबर ते घाबरले आणि त्यांनीं बचावाचें धोरण स्वीकारण्याचा प्रयत्न केला. रेल्वे पोलीस सब-इन्स्पेक्टर सींग यांस बोलविण्यांत आलें आणि त्यांची झडती घेण्यांत आली. एकाच्या सामानांत ड्रायव्हिंग लायसेन्स सांपडलें. या लायसेन्सवर अरबशाह अहमद तय्यद हें नांव होतें आणि त्याचा फोटोहि होता. नंतर त्यांनीं स्वतः अरबशाह आणि त्याचा सोबती जमशेद असल्याचें कबूल केलें. त्याआधी त्यांनी जमशेदचें नांव गझनखान असल्याचें खोटें सांगितलें होतें. दोघांना अटक करण्यांत





झाली. त्यांच्याजवळ १,०८० रुपये आणि किंमती कपडे आणि किंमती रिस्ट वॉचेस मिळालीं. खरेदी केलेल्या वस्तूंच्या पावत्याही त्यांच्याजवळ मिळाल्या. मुंबई सी. आय. डी. पोलीस ज्या दरोडेखोरांचा तपास करीत आहेत ते दरोडेखोर आपणच असल्याचें दोघांनी कबूल केलें. १७ जूनला मुंबई सोडल्याचें आणि १९ जूनला कलकत्याला आल्याचें त्यांनी सांगितलें. त्या दिवशीं आणि त्यानंतरच्या दिवसांत त्यांच्या वाट्यास आलेल्या पैशांतून अनेक वस्तू खरेदी केल्याचेंहि त्यांनी सांगितलें.

### मुंबईला आणलें

कलकत्ता येथें सर्व पुरावा गोळा करून त्या दोन दरोडेखोरांना १४ जुलैला मुंबईला आणण्यात आलें. दादर स्टेशनावर त्यांना मी उतरून घेतलें. ते कोणाला दिसूं नयेत म्हणून आणि ओळख पटवणाऱ्या साक्षीदारांना त्यांना दाखविण्यांत आलें होतें अशी तक्रार कोर्टापुढें त्यांना करता येऊ नये म्हणून स्टेशनवर उतरतांच त्यांना " बुरखा " घालण्यांत आला.

सी. आय. डी. ऑफिसमध्यें आल्यावर मी " ओळख " परेड घेतली. प्रभू, दलीसिंग, देसाई आणि सिसेल लीयॉन मॅक साक्षीदारांनी ड्रायव्हर कोइलोस ठार मारणारा म्हणून अरबशाह यास ओळखलें. याशिवाय दलीसिंग यांनी दरोडेखोरांची पाँटिआक मोटार चालविणारा म्हणून जमशेद यास ओळखलें.

ओळख परेड नंतर मी लगेच अरबशाह व जमशेद यांना प्रश्न विचारण्यास सुरवात केली. अरबशाहनें असें निवेदन केलें कीं, ते कुलाबा येथें बुढहौस रोड येथील त्यांच्या मित्राच्या खोलींत गेले, येथें कपडे बदलून झाल्यावर त्यांनीं अबदुल अझीझ रहात असलेल्या इमारतींतील संडासांत दोन सुरे लपविले. मला त्या स्थळीं नेल्यावर दोन पंच साक्षीदारासमोर त्यांनी संडासाच्या टांकीमधून सुरे काढून दिले. सुऱ्यांच्या पात्यांवर लाल डाग अद्यापही दिसत होते. ज्या केमिकल अॅनलायझरांकडें सुऱ्यांची पातीं पृथःकरणासाठीं पाठविण्यांत आलीं होतीं, त्यांनी सुऱ्यांच्या पात्यावर असलेलें रक्त माणसाचें आहे असा अभिप्राय दिला. अरबशाहनें सांगितलें कीं, एक सुरा माझा आहे आणि दुसरा सुरा पॅट्रीकचा आहे. पॅट्रीकला आम्ही ओळखूं कतों, त्यानेंच कॅशिअर प्रभूच्या अंगावर वर जखमा केल्या.

१५ जुलै रोजीं मी अरबशाह आणि जमशेद या दोघांच्या बोटांचे व तळहाताचे ठसे घेऊन ते ठसे तज्ज्ञ श्री. कुमार यांच्याकडे पाठविले. पाँटिआक मोटारीवर आढळलेल्या तीन ठशांशीं अरबशाहचे ठसे जुळत होते तर जमशेदचे ठसे उरलेल्या ठशांशीं जुळत नव्हते.

लखनौ आणि बनारस मध्यें ज्या दोन निरनिराळ्या लॉजमध्यें अरबशाह आणि जमशेदने वास्तव्य केलें होते तेथूनहि पुरावा गोळा करण्यांत आला. ता. २६ जून ते ८ जुलै १९५७ च्या दरम्यान त्यांनी येथें कांहीं वस्तू खरीदल्या होत्या. ज्या दिवशीं ते लखनौहून कलकत्यास गेले त्या दिवशीं म्हणजे ता. ९ जुलै रोजीं त्यांना मुंबई सी. आय. डी. पोलिसांनी केलेली अटक अगदीं नाट्यपूर्ण अशी होती.

### शस्त्रांची ओळख

त्या अवधींत, दिलावरखानकडून जप्त केलेलें पिस्तूल आणि एक जिवंत काडतूस मी चीफ सुपरिंटेंडेंट, टेक्निकल डेव्हलपमेंट डिपार्टमेंट, गव्हर्मेंट ऑफ इंडिया, खडकी, यांच्याकडे पाठविलें. तेव्हां निःसंशय असें सिद्ध झालें कीं, गुरखा वॉचमनवर दिलावरखाननें झाडलेल्या गोळ्या त्या पिस्तूलमधीलच होत्या.

तपास केला असतां, सय्यदखान आणि विजयचंद्र ठाकूर या दोघांनी ता. १३ जून १९५७ रोजीं कार्मिकल रोडवरील पाँटिआक मोटार चोरली असल्याचेंहि आढळून आलें. मोटारीचा बी. एम्. यू. १६९९ हा नंबर बदलून त्याजागीं बी. एम्. यू. १४८३ हा खोटा नंबर लावण्याचें काम पॅट्रिकनें केलें. मूळची नंबर प्लेट १८ जून रोजीं जेव्हां पाँटिआक मोटारीची झडती घेतली त्यावेळीं मिळाली.

व्यवस्थितपणें संपूर्ण पुरावा गोळा केल्यानंतर सहा दरोडेखोरांबद्दल आरोपपत्रिका तयार करण्यांत आली. कमिटल कोर्टानें त्यावर सात निरनिराळ्या मुद्यांवर आरोप ठेऊन ता. १८ सप्टेंबर १९५७ रोजीं त्यांना चौकशीसाठीं सेशन्स कोर्टाच्या हवालीं केलें.

ता. २८ नोव्हेंबर रोजीं सेशन्स कोर्टात एका स्पेशल ज्यूरीसमोर चौकशी सुरू होऊन ती ता. २३ डिसेंबर रोजीं संपली. माननीय मुख्य सेशन्स जज श्री. आर. बी. मेहता हे प्रिसायडिंग जज होते. सर्व दरोडेखोरांविरुद्ध तयार करण्यांत आलेल्या आरोपांनुसार नऊहि ज्यूरींनीं त्यांना एकमतानें दोषी ठरविलें.

**शिक्षा**—दिलावरखान मिरासलामखान यास इंडियन पिनल कोडाच्या ३९५, ३९५, ३९७ या कलमांखालीं जन्मठेपीची शिक्षा झाली.

पॅट्रिक रोझारिओ डिसूझा यास इंडियन पिनल कोडच्या ३९५, ३९७ या कलमांखालीं जन्मठेपेची शिक्षा झाली.

सय्यदखान अमीरखान यांस इंडियन पिनल कोडया ३९५ आणि ३९६ या कलमाखालीं जन्मठेपेची शिक्षा झाली.

विजयचंद्र ठाकूर यास इंडियन पिनल कोडच्या ३९५ आणि ३९६ या कलमांखालीं दोषी ठरवून १० वर्षांची सक्त मजुरीची शिक्षा देण्यांत आली.

अरबशाह अहमदशाह यास इंडियन पिनल कोडच्या ३९५, ३९७ या कलमाखालीं तसेंच ड्रायव्हर कोइल्होचा मारेकरी म्हणून दोषी ठरवून फांशीची शिक्षा देण्यांत आली. आणि जमशेद बाबूजान यास इंडियन पिनल कोडच्या ३९५ व ३९६ कलमांखालीं जन्मठेपेची शिक्षा देण्यांत आली.

### न्यायाधिशांचा शेरा

निकालपत्र वाचून दाखवितांना मुख्य सेशन्स जजांनीं, दरोडेखोरांनीं केलेल्या गुन्ह्याबद्दल त्यांना दोषी ठरवून असें सांगितलें कीं, समाजांतील सर्व कायदा व सुव्यवस्था नष्ट करणारी अत्यंत भयानक, लुटीची आणि राक्षसी अशी घटना आहे.

त्याचवेळीं सी. आय. डी. अधिकाऱ्यांनी केलेल्या तपासाबद्दल त्यानी त्यांची प्रशंसा केली.

दरोडेखोर अरबशाह याची फांशीची शिक्षा कायम करणारा खटला आणि त्याविरुद्ध त्याने केलेलें अपील हायकोर्टानें ऐकून घेऊन ते १८ मार्च, १९५८ रोजीं संपविण्यात आलें. हायकोर्टानें त्याची फांशीची शिक्षा कायम करून निरपराधी ड्रायव्हर कोइल्होची हत्या करणाऱ्या त्याच्या भ्याड नि राक्षसी कृत्याबद्दल त्यास दोष दिला. त्याचवेळीं हायकोर्टाच्या न्यायाधिशांनी, सी. आय. डी. अधिकाऱ्यांनी केलेल्या जलद, आणि योग्य तपासाबद्दल त्यांनी प्रशंसा केली.

(मुंबई पोलीस पत्रिकेवरून)

• • •

अनुक्रमणिका








अ नं त  का णे क र

*एकट्यानें 'प्रवास' कधींच करीत नाहींत*
*आपल्याबरोबर ते वाचकांनाहि तेथें नेतात.*
*—— आतां पुन्हा एकदां ते आपल्याला....*

# सोनेरी उन्हांत पाचूचीं बेटं

*............दाखवायला नेत आहेत.*

**ता. १६ मे १९५५**

पूर्वेकडे जायला 'कॉर्फ्यू' बोट दुपारीं बारा वाजतां मुंबईहून सुटावयाची होती; तेव्हां सकाळीं दहाच्या सुमारास बॅलार्ड पिअरवर येऊन पोहोंचलों. वैद्यकीय तपासणी, कस्टमची पहाणी वगैरे साडेदहापर्यंत संपवून नंतर उतारूंना आंत बोटीवर सोडणार होते जाऊनयेऊन या बोटीवर बत्तीस दिवस मला काढावयाचे होते. 'कॉफ्यू' हेंच बत्तीस दिवस माझें घर होणार होतें. या घरांत कोण सोबती भेटणार, कुणाबरोबर हे दिवस काढावे लागणार, ही विवंचना मनाला हळूच कुरतडीत होती. पोहोचवायला आलेल्या मित्रांबरोबर बॅलार्डपिअरच्या वरच्या मजल्यावर चहा प्यायला गेलों तों तिथें 'आशा प्रॉडक्स'चे श्री. वाखणकर भेटले. श्री. वाखणकरांचा माझा बराच जुना परिचय होता. 'इकडे कुठें?' म्हणून त्यांना विचारतां, नागपूरचे प्रख्यात वकील श्री. बोबडे यांना पोहोचवायला ते आल्याचें कळलें. श्री. बोबडे व त्यांचे मित्र श्री चांदूरकर हेही माझ्यासारखेच पूर्वेच्या प्रवासाला निघाले होते, आणि माझ्याप्रमाणें याच बोटीनं परत येणार होते. वाखण-करांनीं त्या दोघांची ओळख करून दिली तेव्हां मला अतिशय आनंद झाला. मनावरचें एक ओझें उचलल्यासारखें झालें. मराठी बोलणारीं एक सोडून दोन माणसें बरो-बर आहेत, हें पाहून मन मोकळें झालें. भाषेची आपुलकी ही कांहीं एक विलक्षण गोष्ट आहे यांत शंका नाहीं.

बारा वाजतां बोटीनें धक्का सोडला आणि मुंबईबंदर हळूहळू अस्पष्ट होऊं लागलें. बोबडे व चांदूरकर या दोघांना एक केबिन होतें. माझेंही केबिन दोन माणसांचेंच होतें. आपला जोडीदार कोण आहे तें पहाण्याकरतां खालीं केबिनमध्यें गेलों. सिंगापूरला जाणारा एक वयस्क सिंधी गृहस्थ माझ्या वरच्या बर्थवर होता. माझें सामान केबिनमध्यें लावून वरच्या डेकवर आलों, आणि बोबडे-चांदूरकर बसले होते तिथें डेकचेअर ओढून त्यांच्याबरोबर बोलत बसलों. एक योगायोग सांगण्यासारखा आहे. बोटीवर वाचण्याकरतां पूर्वेकडल्या प्रदेशां-संबंधींचीं बरीचशीं इंग्रजी पुस्तकें मी बरोबर घेतलींच होतीं, पण त्याबरोबर लोकमान्य टिळकांचें 'गीता रहस्य' ही शांतपणें बोटीवर वाचण्याकरतां घेतलें होतें. 'तुम्ही कोणतीं पुस्तकें आणलीं आहेत?' म्हणून बोबडे-चांदूरकरांना विचारतां त्यांनींही 'गीतारहस्य' आणल्याचें सांगितलें! त्याशिवाय 'ज्ञानेश्वरी', 'कुराण' चें इंग्रजी भाषांतर आणि 'बाय-बल' ही त्यांनीं आणलें होतें!

बोटीवर चढल्याबरोबर पहिली गोष्ट करा-वयाची म्हणजे जेवणघरांत आपलें टेबल ठरवून टाकायचें. नंतर प्रवास संपेपर्यंत त्याच टेबलावर आपल्या ठरलेल्या खुर्चीवर बसून तिन्ही वेळचीं जेवणें घ्यायचीं असतात. एका निवांत कोपऱ्यांत खिडकीजवळ असलेलें चार माणसाचें टेबल होतें. आपण तिघानीं तें टेबल ठरवून टाकावें असा विचार करून आम्ही जेवण घराच्या मुख्य स्ट्यूअर्डकडे गेलों. यापूर्वी इटालियन आणि फ्रेंच बोटीनीं मी प्रवास केला होता. त्या स्वातंत्र्यपूर्व काळांत ब्रिटिश बोटीनीं प्रवास करूं नये असें वाटत होतें तें ठीकच होतें. आतां तसें कांहीं वाटत नव्हतें; आणि 'कॉफ्यू' वरल्या आमच्या बरोबरच्या ब्रिटिश स्त्री-पुरुषांची वागणूकही ब्रिटिश स्वभावाच्या मर्यादेत चांग-लीच मोकळेपणाची होती. पण हा म्हातारा स्ट्यूअर्ड थोडी जुन्या काळाची आठवण करून देणारा निघाला. त्याच्याकडे जाऊन 'अमुक टेबल आम्हांला तूं देऊं शकतोस का?' असें आम्ही त्याला विचारलें. तेव्हां आपल्या तार-लेल्या भोपळ्यासारख्या चेहऱ्यावर शिष्टपणाचा आव आणून आणि कावळ्यासारखा एक डोळा वर करून 'कुठलं टेबल कुणाला द्यायचं तें माझ्या मर्जीवर आहे!' असं तो हंसत हंसत म्हणाला. 'तुझी ती मर्जी हें टेबल आम्हांला देण्याकरतां वापर!' असं चांदूरकर म्हणाले, तेव्हां तो थोडा नरमला, आणि 'बरं बरं' म्हणून 'तें' टेबल त्यानें आम्हाला दिलं.

सूर्याच्या उष्णतेचा त्रास होत नाहीं इतका त्याच्या ऊष्णतेनें तापलेल्या वाळूचा होतो, या न्यायानें या साहेबापेक्षांही बोटीवरल्या 'गांवठी साहेबां'चा आम्हाला अधिक त्रास झाला. इटालियन किंवा फ्रेंच बोटीवरले गोरे वेटर किंवा या बोटीवरलेही गोरे वेटर बहुतेक हंसतमुख आणि आदबशीर होते. दुपारच्या चहाच्या वेळीं कोणत्याही टेबलावर बसतां येत असे. त्यावेळीं आलेला गोऱ्या वेटरांचा अनुभव चांगला होता. पी. अँड ओ. च्या बोटीवर गोऱ्या वेटराबरोबर गोव्याचे गांवठी साहेबही असतात. यांतला एक साहेब आमच्या कायमच्या टेबलावर आमच्या वाट्याला आला होता. हा म्हातारा जितका नालायक तितकाच तिरसट आणि तुसडा होता. सांगितलेलं नीट ऐकायचं नाहीं, ऐकलेलं नीट करायचं नाहीं, आणि एकदम तिरसटपणें उलट उत्तर द्यायचं, हे त्याचे विशेष पहिल्याच दिवशीं आमच्या ध्यानांत आले. 'मेन्यूकार्ड' वर प्रत्येक 'कोर्स' चे हा नाहीं तर तो, तो नाहीं तर तिसरा असे दोन चार पदार्थ असतात. फ्रेंच किंवा विचित्र इंग्रजी नांवें असल्यामुळें एखादे वेळी गोमांसाचा

अनुक्रमणिका

कुठला पदार्थ, इतर मांसाचा कुठला हें समजत नाहीं. वेटरचें इंग्रजी किंवा फ्रेंच आमच्यापेक्षां चांगलें असेल या समजुतीनें नव्हे, तर रोजच्या संवयीनें त्याला माहीत असायला हवें म्हणून हें घ्यावें कीं तें घ्यावें म्हणून कार्डावर बोट ठेवून मी त्याला विचारीत होतों. माझा प्रश्न पुरा व्हायच्या आंतच 'तुम्ही सर्व कांहीं घेऊं शकतां!' असें आपल्या कोंकणी हिंदींत त्यानें मला सांगितलें. मी एकदम थांबलों आणि त्याच्याकडे पाहूं लागलों, 'काय आणूं?' म्हणून त्यानें विचारलें, तेव्हां 'सर्व कांहीं आण!' म्हणून त्याला मी सांगितलें. तो माझ्याकडे पाहूं लागला. 'पाहूं नकोस, सर्व कांहीं आण!' असें मी त्याला बजावलें. त्याला चांगला दम भरल्यापासून माझ्याशीं किंचित् नम्रपणें तो वागूं लागला.

सत्तरीच्या जवळ आलेल्या बोबड्यांसारख्या वयोवृद्ध गृहस्थाशीं तो फारच उद्धटपणें वागूं लागला तेव्हां मुख्य स्टयूअर्डला सांगून आम्ही त्याला चांगला सरळ केला. गोऱ्या उतारूंचे आपण नोकर इतर हिंदी, चिनी वगैरे उतारूंचे आपण नोकर नाहीं, अशी कांहीं तरी समजूत बऱ्याच गांवठी साहेबांची झालेली होती. गौरेतर उतारूंच्या या गांवठी साहेबांबद्दल दररोज कांहीं तरी तक्रारी होत. एकदां आमचा वेटर खुषींत येऊन मला सांगूं लागला, 'साहेबलोकांनाही मेन्यूकार्डवरील फ्रेंच नांवं केव्हां केव्हां कळत नाहींत.' मी त्याला म्हटलें, 'साहेबलोकांनाहि या तुझ्या शब्दांचा अर्थ काय? ते साहेब आहेत म्हणून आमच्यापेक्षां अधिक शिकलेले आणि कुणीतरी मोठें आहेत असं तुला वाटतं कीं काय! त्यांच्यांत कुणी कापडविके असतील तर कुणी एखाद्या कचेरींतले कारकून असतील. आपल्या टेबलावरले हे बोबडेसाहेब नी चांदूरकरसाहेब कोण आहेत याची तुला कल्पना आहे काय? हे बोबडेसाहेब नागपूर हायकोर्टाचे जज्ज होते, आणि हे चांदूरकर साहेब दिल्लीच्या सुप्रीम कोर्टांत प्रॅक्टीस करणारे विद्वान् वकील आहेत!'

माझी खोली साफसूफ ठेवणारा स्टयूअर्ड मायत् हाही गोवेकर खिस्तीच होता. पण याचें काम जितकें चोख तितकाच त्याचा स्वभावही चांगला होता.

दुपारीं जेवणानंतर डेकवर फिरत असतां हरकचंद नांवाच्या एका सिंधी गृहस्थाची ओळख झाली. पिनांगला तो चालला होता. गेलीं सात-आठ वर्षें मलायाच्या जंगलांतून कित्येक हजार कम्युनिस्ट बंडखोरांनीं ब्रिटिश राज्यकर्त्यांशीं गनिमी काव्याचें युद्ध चालविलें आहे, आणि यूरोपियन मळेवाल्यांचे खून पाडणें, जाळपोळ करणें वगैरे प्रकार मलायांत सतत चालू आहेत. वर्तमानपत्रांतून या संबंधींच्या बातम्या नेहमीं येत असल्यामुळें हरकचंदाला त्यासंबंधीं मी विचारलें. व्यापाराकरतां मलायांत कित्येक वर्षें तो राहिलेला होता. तो म्हणाला, 'अलिकडे ही बंडाळी बरीचशी कमी झालेली दिसते. ब्रिटिशांचें केवढें तरी मोठें लष्कर सध्यां मलायांत आहे;



आणि पूर्वींसुद्धां जंगलांतल्या दूरदूरच्या गांवांना आणि मळेवाल्यांना कांहीं त्रास झाला असेल, पण पिनांग, सिंगापूर, इपो, कुआलालपूर वगैरे शहरांत किंवा शहरांच्या आसपास असलेल्या आम्हा लोकांना या बंडाळीची फारशी माहितीहि नाहीं नी उपद्रवही झालेला नाहीं.'

रात्रीं अकराच्या सुमारास कॅबिनमध्यें झोंपायला गेलों तों माझा जोडीदार सिंधी व्यापारी आधींच आपल्या बर्थवर येऊन झोंपलेला दिसला. त्याचा भव्य पोटाचा भाग वरखालीं होत होता, आणि एका नाकपुडींतून वाघ आणि दुसरींतून सिंह घोरतो आहे कीं काय असा भास उत्पन्न करणारे त्याचे घनघोर घोरणें चालू होते! तें घोरणें कानांवर पडल्याबरोबर माझ्या काळजाचा थरकाप झाला; आणि मॅक्बेथच्या सुरांत, 'झोंप!—आतां कसची यापुढें झोंप!' असें स्वगत पुटपुटत मी शेळीसारखी उशीवर मान टाकली.

## ता. १७ मे १९५५

प्रातरुपहार घेऊन आज सकाळीं डेकवर फिरत असतां कांचेच्या चवकटींत बसवलेला एक मोठा नकाशा एका बाजूला लावलेला दिसला. या नकाशांत मुंबई ते हाँगकाँग सर्व प्रदेश आणि बोटींचा मार्ग दाखविलेला होता. सकाळीं आठ ते दुसरे दिवशीं सकाळीं आठ पर्यंत दर चार तासाला बोट कुठें असेल तें या प्रकाशावर लाल, निळ्या, पिवळ्या, हिरव्या डोक्यांच्या पिना ठिकठिकाणीं लावून आणि त्याच रंगाच्या पिना बाजूला एके ठिकाणीं सकाळचे आठ, दुपारचे बारा, दुपारचे चार, रात्रीचे आठ अशा रीतीनें वेळा दाखविणाऱ्या कागदावर टोंचून दाखविलें होतें. पश्चिम किनाऱ्यानें खालीं कोलंबोकडे आमची बोट चालली आहे. आतां सकाळचे पावणेअकरा वाजले आहेत. सोसाट्याचा वारा वहातो आहे आणि जोराचा पाऊस पडतो आहे. नकाशावरून साडेअकराच्या सुमारास मंगळूर बंदरासमोरून आम्ही जाणार. किनाऱ्यापासून बोट खूपच दूर आहे. कोंकणच्या बोटींतून दिसतो तितकाही स्पष्ट किनारा दिसत नाहीं. पण दूर खूप दूर निळसर डोंगरांच्या रांगा दिसत आहेत. भूमाता अगदींच दिसली नाहीं तर तिच्या लेकरांचीं मनें अस्वस्थ होतात.

रेषांच्या अस्पष्ट दर्शनानेंही माझ्या मनाला अमोघ आनंद होतो.

डेकवर आम्ही बसलों होतों तिथेंच शेजारच्या आरामखुर्चीवर एक सिंधी गृहस्थ बसला होता. दर पांच मिनिटांनीं तो पचकन् करून कठड्याकडे थुंकायचा. चांदूरकरांच्यानें रहावेना. तो उलटून कांहीं तरी उत्तर देईल याची पर्वा न करतां ते त्याच्याकडे जाऊन म्हणाले, 'हें पहा, असं थुंकणं बरं नव्हे. एका स्वतंत्र देशाचे आपण नागरिक आहोंत. अशा वागण्यानें या गोऱ्या लोकांसमोर आपल्या देशाची बेअब्रू होते! सुदैवानें त्यानें निमुटपणें त्यांचें म्हणणें ऐकून घेतलें, आणि तो थुंकायाचा थांबला.

अंडी, मासे, पाव, लोणी, जाम, कॉफी वगैरेंची भरपूर न्याहारी होऊन अजून दोन तास झाले नव्हते. आतां सकाळीं दहाच्या सुमारास डेकवरच हवें त्याला कागदी कपांतून आइस्क्रीम खायला देण्यांत आलें होतें आणि दुपारच्या जेवणाला दोन अडीच तासच होते, तरीही कांहीं ब्रिटिश स्त्री-पुरुष आपल्या केबिनमधून स्वतःचे बिस्किटांचे डबे आणून बिस्किटें खात बसलेले पाहून आम्हांला आश्चर्य वाटलें. ब्रिटिशांचा खादाडपणा इतर युरोपियन लोकांच्या

थट्टेचा विषय कां झाला आहे त्याचें इथें प्रत्यंतर आलें.

सिंधी लोक व्यापाराकरतां जगाच्या पाठीवर कुठें जाऊन राहिले आहेत त्याची या बोटीवर येईपर्यंत मला कल्पना नव्हती. डेकवर आज एक वृद्ध सिंधी गृहस्थ भेटला. स्पेनमध्यें जिब्राल्टर आणि उत्तर आफ्रिकेंत टँजिअर येथें त्याचा व्यापार आहे. मुंबईहून जिब्राल्टरला जाणाऱ्या कोणत्याही बोटीवर जागा मिळेना म्हणून खालीं कोलंबोला जाऊन तो जिब्राल्टरची बोट घेणार आहे. कोलंबोहून फ्रेंच, डच, ब्रिटिश वगैरे नाना राष्ट्रांच्या बोटी यूरोपला जातात त्याच्याकडून कळलें कीं जमेका, फिलिपाईन्स, बोर्निओ वगैरे अनेक ठिकाणी सिंधी लोक व्यापाराकरतां गेले आहेत.

आज सारा दिवस पावसाळी हवा आहे. जूनच्या पहिल्या आठड्यांत मुंबईत पाऊस सुरू होतो. त्या आधीं पंधरा दिवस कोलंबो येथें मॉन्सून येतो असें म्हणतात. तेव्हां कोलंबोला पावसाळा सुरू झालेला असावा. उद्यां समजेलच. आज सूर्याचें दर्शन नाहीं.

पी. अँड ओ. ची आमच्या 'कॉर्फ्यू' च्या जोडीची 'कॉर्थेज' बोट मुंबईकडे चालली आहे ती संध्याकाळीं पावणेसहाला आमच्या बाजूनें जाईल, असें दुपारच्या चहानंतर ध्वनिक्षेपकावरून सांगण्यांत आलें. दुसरी बोट दिसणार हा बोटीवरल्या जीवनांत एक मोठाच प्रसंग! आम्ही उतारू मोठ्या उत्सुकतेनें 'कॉर्थेज' ची वाट पहात होतों. शेवटीं एकदांची पावणेसहाला ती दिसली, आणि आम्ही स्वस्थ झालों. जमिनीवरल्या मोठ्या जगांतून या तरंगत्या चिमुकल्या जगांत येऊन पडल्यामुळें कांहीं लहानसहान गोष्टी एकदम मोठ्या वाटूं लागतात. कुठें जमीन दिसली कीं चांगली प्रौढ माणसें मुलांसारखी हुरळून जातात.

रात्रीं जेवणानंतर 'कॅरिंग्टन, व्ही. सी.' हा नांवाजलेला ब्रिटिश बोलपट डेकवर दाखवण्यांत आला.

### ता. १८ मे १९५१

रात्रभर बाहेर समुद्रावर घोंघावणाऱ्या वाऱ्यांचे 'हूं' 'हूं' असे आवाज केबिनमध्यें ऐकूं येत होते. नकाशांत वाचलें होतें कीं सकाळीं आठच्या सुमारास आम्ही कन्याकुमारीसमोर असूं. दक्षिण भारताच्या प्रवासांत कन्याकुमारीच्या टोंकाला रात्रीच्या मिट्ट काळोखांत आम्हीं इथें असतां तीन महासागरांवरून येणारे वारे समोरच्या काळोखांत असेच घोंघावत होते; आणि सारा भारतवर्ष आपल्या मागें उभा आहे या मनांत हेलावणाऱ्या भावनेनें स्वतःला धीर देत भयचकित नजरेनें आम्हीं समोर पहात होतों.

दुपारीं १२ ला मानारच्या आखातांत आणि ४ वाजतां कोलंबो असें नकाशांत होतें; पण चहाच्या वेळीं ध्वनिक्षेपकांनीं सांगितलें कीं बोट संध्याकाळीं साडेसहाच्या सुमारास कोलंबो बंदरांत शिरेल. कोलम्बोला बोट धक्क्याला



लागत नाहीं. धक्क्यापर्यंत वाफोरांतून किंवा लॉंचेसमधून उतारूंना नेआण होते. उतरणाऱ्या उतारूंना वाफोराचें तिकिट घ्यावें लागत नाहीं. पण कोलंबोंत फिरून परत बोटीवर येणाऱ्यांना तीन शिलिंगांचें तिकिट बोटीवरच मिळतें तें घ्यावें लागतें. आम्ही तिकिटें घेऊन पांच वाजतां कपडे करून तयार राहिलों होतों. साडेपांचच्या सुमारास दूर अंतरावर नारळीच्या दाट बनांनीं भरलेला सिलोनचा किनारा दिसूं लागला. समुद्र अतिशय खवळलेला होता, आणि ढगाळ आकाशांतून सारखा पाऊस पडत होता. साडेसहाला बोट कोलंबो बंदरांत शिरणार आणि रात्रीं आराला सुटणार तेव्हां या पावसांत कोलंबोंत जाऊन तरी करायचें काय असा विचार आम्ही करीत होतों.

सहाला कोलंबो बंदर स्वच्छ दिसूं लागलें. हिरवेगार डोंगर, त्यांच्यावरील लाल छपरांची घरें, बोटी सुरक्षित उभ्या रहाव्या म्हणून समुद्रांत बांधलेले लांबच लांब बांध, त्यावरील पांढरीं दीपगृहें भराभर जवळ येऊं लागलीं. फ्रेंच, इटालियन, जर्मन, नानादेशांच्या मोठमोठ्या बोटी बंदरांत उभ्या होत्या. आमची बोट उभी राहिली. पाऊस पडतच होता. आठ वाजतां जेवण घेऊन परत डेकवर आलों तेव्हां पाऊस थांबला होता. रात्र असली आणि फार वेळ नसला तरी धक्क्यावर जाऊन गांवांत फिरून तर यावें असा विचार करून वाफोरांत बसलों आणि धक्क्यावर गेलों. कोलंबो एवढें मोठें आंतरराष्ट्रीय बंदर असून हा धक्का अगदींच एखाद्या वखारीसारखा सामान्य आहे मात्र पायऱ्या चढून वर गेल्यावर बंदराची भव्य पांढरी इमारत दिसते, आणि सिलोन सरकारच्या माहिती खात्याचें सिलोनमध्यें होणाऱ्या हस्तिदंती वस्तू वगैरेंचं प्रदर्शन आणि प्रवाशांसाठीं रंगीबेरंगी पुस्तकें असलेलें दालन, सिलोनी चहाचें सरकारी दुकान, पैसे बदलण्याचा ब्यूरो वगैरे पाहून मोठ्या शहरांत आल्यासारखें वाटतें. (अपूर्ण)

### भ्रम....

उडूं लागली खिडकी  
सुटे बिजागरांतून...  
जुन्या चिंचोक्यांचे झाले  
कोनाड्यांत ओले क्षण...!

ताक चाळतांना बघे  
आजी चरापून वर  
आजोबांचा जुना कोट  
हलूं लागे खुंटीवर...!

जुनें लोढ खाकरून  
म्हणे, "आण थोडें ताक...!"  
घेई झांकूनिया डोळे  
माजघरांत काळोख!

चुलींतून धुराचा ये  
केस पिकलेला लोट...  
एक कवडसा ठेवी  
घट्ट ओठांवर बोट...!

—मंगेश पाडगांवकर

या प्रवासवर्णनाचा यापुढील  
चित्तवेधक हप्ता  
पुढील अंकांत

( पान ३४ वरून चालू )

होता का ? कां मदत म्हणून घेतली पण ती स्वीकारणें त्याच्या मानी स्वभावाला जमलें नाहीं ? काय झाले असेल—?

त्याहि गोष्टीला आतां तीनचार वर्षें झाली. शाहीरनें पहिल्या सावकाराची नोकरी सोडली. आतां तो गांवांतच आहे. गांवांत एका धनिकानें चांगले शहरी थाटाचे दुकान काढले आहे. त्या दुकानची त्याची नोकरी पहिल्या नोकरीसारखीच आहे. दुकान दुसऱ्या एका सावकाराचे आहे पण सारा गांव म्हणतो ' शाहीरचे दुकान.' शाहीरनेहि तें दुकान तसेंच चालवले आहे. आणा कीं नवा पैसा इकडचा इकडे होऊं देत नाहीं तो. दुकान भरभराटीत आहे पण शाहीरची स्थिति आहे तीच आहे. पूर्वी खेड्यांत त्याच्या वडिलार्जित मालकीचे घर होते. आतां त्या घरांतहि तो राहात नाहीं. त्याचा एक थोरला भाऊ अचानक वारला. त्याची मुलेंबाळें त्यांत राहतात. त्यांचे घर शाहीरच चालवतो. फक्त त्यांच्याबरोबर राहात नाहीं.

' असें रे कां ? ' मी त्याला विचारले.

' बायका बायकांत कुरबुर होते एखादे वेळीं. थोडावेळ भावाच्या घरीं असतो थोडावेळ माझ्या बिन्हाडी असतो. बाकी दुकान आहेच. पंधरावड्याला सायकलवरून पंढरीला जातों. माघांत सज्जनगडी जातो. गोंदवल्याचा उत्सव चुकवत नाहीं. '

' तूं इथें नसलास तर अप्पाचं घर... '

' समर्थ चालवतात. '

' कोठेहि चित्तासी नसावें बंधन
अंतरीं नारायण आठवावा. '

' हे संतपणानं देवाचं वेड कुठनं शिरलं तुझ्या डोक्यांत ? '

' जो घालतो पोटासी शरीर विकावें लागते त्यासी
मा जेणें घातले जन्मासी, त्यासी कैसे विसरावें ? '

समर्थांची वाणी शाहीरच्या मनींमानसीं इतकी खिळली गेली आहे. समर्थोक्तिवांचून भाषण करणें त्याला अशक्य होऊन बसलें आहे. माझ्या खेड्यावरच्या मुक्कामांत तो न चुकता येतो. कधीं कधीं त्याला जागृती येते तेव्हां मी जागा असतो. तो झोंपडीचे दार उघडून निघाला कीं मी विचारतो

' शाहीर कुठ जातोस इतक्या पहाटे. थंडी आहे. '

' दूर बहिर्दिशेसी जावें. ' तो दासबोधाच्या वाणींतच उत्तरतो.

त्याचे खेडे माझ्या खेड्याजवळच आहे. दुकानच्या कामासाठीं त्याला मधूनच त्याच्या खेड्याकडे जावें लागतें. मी म्हणतो, ' शाहीर संध्याकाळीं कां जाईनास '

' रात्र होईल. समर्थांनीं म्हटले आहे. अंधारीं मार्ग चालूं नये एकल्यां-' त्याच्या ओठींपोटीं समर्थवाणी राहिलेली आहे गळ्यांत तुळशीची माळ आहे. प्रपंच हा असाच आहे. पण त्याच्या तोंडावरचे हंसूं मावळत नाहीं. त्याची विनोदबुद्धि विरत नाहीं—

शाहीर राहातो तें खेडें एक महत्त्वाचे गांव आहे. तेथे दूरदूरचे लोक सरकारी नोकरीच्या निमित्तानें येतात. आठपंधरा दिवसांत ते शाहीरचे भक्त बनतात. लिप्टन चहाचा प्रचारक शाहीरला आपला भाऊ मानतो. तीड कार्य चालविण्यासाठीं आलेले कानडी कुळकर्णी शाहीरला अण्णा म्हणूनच हांक मारतात. पोस्टमास्तराची संध्याकाळची बैठक शाहीरच्या दुकानीं असते. फिरायला जातांना महालकरी फौजदार ही मंडळी शाहीरच्या दुकानीं टेकल्यावाचून राहात नाहीं—

मधेंच नर्सबाई येतात. त्या गुपचुपपणें शाहीरच्या हातीं कांहीं देतात. ती गेल्यावर शाहीर ती वस्तु जमलेल्या मित्रांना जाहीरपणें दाखवतात. ती एखादी पेनिसिलीन आय ऑइंटमेंटची टयूब असते नाहींतर स्ट्रेप्टोमायसिन सारखें त्या गांवीं दुर्मिळ असलेलें एखादें औषध असतें.

' कुणासाठीं ? ' कुणीतरी विचारले.

शाहीरचा माझ्यासारखाच कुणी मित्र शहरांतून आलेला असतो. त्याच्या बायकोचे तिकडच्या धुळीनें डोळे आलेले असतात किंवा त्याच्या एखाद्या लेकराला ताप आल्याची बातमी त्याला बाजारकडून मिळालेली असते. त्याला मदत पोंचविण्यासाठीं शाहीरानें नर्सबाईला थोडा त्रास दिलेला असतो. नर्सबाईनी आवर्जून दिलेली वस्तु निरखीत आणखी एखादा विचारतो, " तुम्हाला कश्या मिळतात या दुर्मिळ वस्तु. "

शाहीर म्हणतो, भीक मागणाराला दाही दिशा मोकळ्या आहेत. हवें तें मागण्यांत लाज कसली ?

समर्थांनी म्हटलेच आहे.

मागीतली पाहिजे भिक्षा, ब्राह्मणाची मुख्य दीक्षा
ॐ भवतीच्या पक्षां सांभाळिले पाहिजे. '

परवां त्याची एक धाकटी मुलगी माझ्या मुलाच्या बरोबर गांवीं आली. मुलांत मूल रमले. चार सहा दिवस इकडेंच राहिली ती मुलगी. मी कशाला तरी शेजारच्या गांवी गेलों. शाहीरच्या दुकानीं गेलों. सहज गमतीनें म्हणालों,

' अरे तुझी मुलगी राहिली कीं आमच्याकडे. '

' राहूं द्या. आजच एक नवीन कन्या झाली आहे. '

विनोद, विरक्ती आणि चाळिसाव्या वर्षी परत अपत्य प्राप्ती. या गोष्टींचा मला तरी मेळ घालतां येत नाहीं. शाहीर त्याचा विचारच करीत नाहीं. माझ्या प्रगतीचे रसभरित वर्णन करून तो दुकानांत जमलेल्या ग्राहकांना सांगतो ही रघुनाथ कृपा.

मनीं आणावें तें तें होते
दुःख अवघेचे विरून जाते
कृपा केलिया रघुनाथें
प्रचीति येते.

माझ्या बाबतींत त्याला अपार समाधान आहे. आणखीहि आमचे एक दोघे बालमित्र आहेत. त्यांची त्याला सदैव चिंता आहे. स्वतःचा प्रपंच हीं त्याला काळजीची वस्तु वाटत नाहीं. आतां त्याचा मुलगा मोठा झाला आहे. तो घरांतलें पाहतो. शाहीर फक्त जेवणा पुरतें घरांत जातो. दुकानाचे काम संपले कीं त्यांचे मित्र जमतात. गप्पांना रंग भरतो. माझी चित्रपटांतील कामगिरी, हरिभाऊ लाळ्यांची प्रगति—मिमू पाटलांची बदली—अनंत मित्रांच्या अनंत गोष्टी सांगत शाहीर रंगतो. लोकांना त्याचे रसाळ बोलणें अत्यंत आवडते. स्वतःची दुःखें तो कधींच बोलत नाहीं. मित्रमंडळींतून उठून घरीं जायला त्याला फार वेळ होतो. बायको मुलें झोपी जातात. शाहीर आपले ताट वाढून घेतों, जेवतो. अंथरुणावर बसल्या-बसल्या शाहीर रामाची आठवण करतो.

' राघोबा उदारा, ये माझ्या मंदीरा '

रघुनाथ कृपेनें मनीं आणावें तें तें होते अशी त्याची निष्ठा आहे. त्याच्या श्रद्धेला ' खो ' देण्याइतका राघोबा निष्ठूर आहे असें कसें म्हणावे ? सामान्य प्रापंचिकाच्या मनीं यावें तें मनीं न आणण्याची विद्या शाहीरनें आत्मसात केली आहे कां ? काय आहे कोण जाणे !

• • •






मौ. अबुल कलम आजाद यांच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या 'इंडिया विन्स फ्रीडम' या आत्मचरित्रानें भारतांत मोठी खळबळ उडाली आहे. अशा या खळबळजनक पुस्तकाचा

**प्रा. न. र. फाटक**

यांच्यासारख्या चतुरस्र विद्वानानें करून दिलेला हा परिचय—

# अखेर भारतानें स्वातंत्र्य मिळविलें



सुमारें महिन्यामागें मौ. अबुल कलम आझाद यांचें आत्मचरित्र प्रसिद्ध झालें. तें जगापुढें येतांच वृत्तपत्रांनीं भारताच्या फाळणीसंबंधांत ज्या घडामोडी कांहींशा पडद्याआड (व कांहींशा लोकवार्तांच्या द्वारें अर्धवट कळलेल्या) होऊन गेल्या त्यांबद्दल मौ. आजादांचें अनुभव या आत्मचरित्रांत नमूद आहेत, म्हणून त्याची जाहिरात करून लोकांचें लक्ष या पुस्तकाकडे वेधून घेतलें. नंतर त्या पुस्तकाची फाळणीच्या व मौ. मजकुरांनीं रेखाटलेल्या कित्येक व्यक्तिचित्रांच्या आधारें कित्येक वृत्तपत्रांतून सविस्तर परीक्षणें छापलीं गेलीं. 'देशाच्या फाळणीचा विचार प्रथम कै. वल्लभभाई पटेलांच्या बुद्धींत प्रकटला; त्याला तेव्हांचे गव्हर्नर जनरल लॉर्ड मौन्टबॅटन यांनीं बळ पुरवले. मग गव्हर्नरजनरलानें फाळणीसाठीं पं. जवाहरलाल नेहरूंची संमति घेतली. मौ. आजाद फाळणीविरुद्ध होते. त्यांचे दोघे जोडीदार बदलले तेव्हां त्यांना एकट्या म. गांधींचा आपल्या मताला पाठींबा मिळेल असा भरंसा वाटत होता. महात्माजी परगांवाहून या वेळीं दिल्लीस येतांच मौलानांचा त्यांच्याशीं जो संवाद प्रस्तुत विषयावर झाला, तो मौलानांच्या अपेक्षेप्रमाणेंच होता; परंतु दोन तीन दिवसांत महात्माजी फाळणीला अनुकूल असल्याचा अनुभव येऊन मौलानांचा भरंवसा खोटा ठरला.' इत्यादि आशयाचा जो मजकूर या आत्मचरित्रांत आहे, त्यास अनुसरून श्री. अमृतकुंवर यांनीं आपल्या माहितीचीं पत्रें वृत्तपत्रांत छापून मौलानांच्या मजकुरांतील दंश काढून टाकण्याचा यत्न केला. पुस्तक बाजारांत येतांच दिल्लीस लोकसभेच्या मंडळींत फार खळबळ उडाल्याच्या बातम्या पसरल्या होत्या त्याचा प्रत्यय पं. नेहरूंनीं वार्ताहरांना दिलेल्या मुलाखतींत जे सवाल जबाब झाले, त्यावरून येण्यासारखा आहे. मौलानांच्या मजकुराला अनुलक्षून वार्ताहरापाशीं पं. नेहरूंनीं जो खुलासा केला, त्यामध्यें 'मौलाना मजकूर हे व्यक्तिवादी स्वभावाचे होते.' अशा धोरणाचा मौलानांबद्दल अभिप्राय आहे. 'राजकारण अतिशय गुंतागुंतीचें व त्याचे धागेदोरे दूरवर पसरलेले असतात, त्यांकडे बारीक लक्ष पुरवून राजकीय नेत्यांना जी महत्त्वाची बाब पुढें येईल ती चौफेर दूरदृष्टीनें निकालांत काढावी लागते.' अशा अर्थाचीं आणखीं कांहीं वाक्यें पंडितजींच्या संभाषणांत आहेत. त्यामध्यें मौलानांच्या मजकुराचें स्पष्ट खंडन कुठेंच नाहीं. यामुळें मौलानांची फाळणीबद्दलची हकीकत जशीच्या तशीच शिल्लक रहाते.

मौ. आजादांनीं आत्मकथा निवेदन करावी, म्हणून त्यांचे चिटणीस श्री. हुमायून कबीर यांनीं पिच्छा पुरविला. शेवटीं मौलानासाहेब आत्मकथा सांगण्याकडे वळले, परंतु लिहिण्याची कामगिरी श्री. कबीरांना करावी लागली. सांप्रत जें पुस्तक प्रकाशांत आलेलें आहे, तें संपूर्ण नाहीं. ग्रंथ-योजनेचा तृतीयांशच लोकांना उपलब्ध झाला आहे व त्यांत १९३५ ते १९४७ पर्यंतच्या बारा वर्षांतील कॉंग्रेसच्या राजकीय चळवळीचा वृत्तांत आहे. जन्मापासून १९३५ पर्यंतच्या वृत्तांताची रूपरेषा पहिल्या १२ पानांत असून १९४७ नंतरच्या इतिहासाविषयीं एक दोनदां आश्वासन उच्चारलें आहे. तें आश्वासन टिपणाच्या रूपानेंहि सफळ झालेलें नाहीं. तें आश्वासन नुसती हळहळ उत्पन्न करणारें आहे. स्वराज्याच्या कारभारांतील खांचाखोंचा सांगायला आजाद इहलोकीं राहिले नाहींत, याची मनाला हुरहूर लागलेलीं पुष्कळ साक्षर माणसें सध्यां दृष्टीस पडतात. पण जेवढा वृत्तांत आजादांनीं निवेदन केलेला आहे, तेवढ्यावरच समाधान मानल्याशिवाय गत्यंतर उरलेलें नाहीं.

या आत्मकथेबद्दल एक बलवत्तर वाटण्याजोगी अशी शंका व्यक्त केली जाते कीं, या वेळोवेळीं श्री. हुमायून कबीर यांना ऐकविलेल्या आजादांच्या आठवणी आहेत. जुन्या आठवणींचें कालांतरानें रूप पालटतें व त्यांच्या खरेपणाबद्दल संशय बाळगतां येतो. आठवणी जवळपासच्या दुसऱ्या आठवणींशीं मिसळून आपली विश्वसनीयता गमावतात, हें सामान्यतः खरें असलें तरी मौलाना आजाद हे स्मरण व पाठांतर या गुणांच्या बलाढ्यते-साठीं प्रसिद्ध होते. आपण ज्या चळवळींत नेतृत्वानें वागलों त्या चळवळीची व सहकाऱ्यांच्या कामगिरीची वस्तुस्थितीस धरून





माहिती सांगण्याची जबाबदारी आजादांना योग्यप्रकारें कळत होती. म्हणूनच त्यांनीं आपल्या आठवणींचें कबीरकृत लिखाण पुनः पुनः तपासलें आणि ह्यांत फेरबदल करण्याची आवश्यकता नाहीं अशी खात्री झाल्यावर तें छापण्याला परवानगी दिली. मौ. आजादांनीं आपल्या आठवणींचा कांहीं भाग पुढील तीस वर्षांनंतर प्रसिद्ध व्हावा या हेतूनें मोहरबंद करून ठेवला, हें त्यांच्या जबाबदारीच्या जाणिवेचें लक्षण समजायला पाहिजे. जबाबदारी मुळींच न विसरतां ज्या अर्थीं मौलानांनीं तयार केलेली हकीकत प्रकाशांत येण्याचा संकोच धरला नाहीं, त्याअर्थीं आपल्या आठवणींत चूक नसल्याचा विश्वास त्यांच्या ठिकाणीं होता, हें कबूल करणें भाग आहे. शिवाय आपल्या डोळ्यादेखत आत्मकथा लोकांसमोर यावी हा त्यांचा हेतु ध्यानांत ठेवणें बरें. आपल्या आत्मकथेवरून वादळ उद्भवल्यास त्याशीं झगडण्याला आपण समर्थ आहों, ही त्यांची भावना लिहून तपासून पक्क्या करण्यांत आलेल्या मजकुराला छापण्याची परवानगी देण्याच्या क्रियेनें सिद्ध होणारी आहे.

मौलानामजकूर हे अत्यंत स्पष्टवक्ते असल्याची ख्याति मुद्दाम सांगायला नको. जें विचारांतीं बुद्धीला पटेल तें बोलून टाकायचे अशा त्यांच्या स्वभावामुळें ते बहुसंख्य मुसलमानांना जसे अप्रिय झाले होते, तसेंच त्यांनीं काढलेल्या वृत्तपत्रांतील त्यांच्या सडेतोड विचारसरणीनें ते ब्रिटिश सरकारलाहि नकोसे वाटत होते. म. गांधींच्या आदरानें त्यांना कॉंग्रेसच्या दलांत ओढलें असलें तरी इतर अनेक गांधीशिष्यांप्रमाणें आजादांनीं आपल्या विचारशक्तीचा स्वतंत्रपणा शेवटपर्यंत गमावलेला नव्हता. कॉंग्रेसचा ठराव पसंत असो वा नसो एकदां ठराव बहुमतानें पसार केला कीं मौलानासाहेब तो बिनतक्रार अमलांत आणायला आणि त्याचे परिणाम भोगायला मागेपुढें पहात नसत, इतकेंच नव्हे तर ठरावाच्या किंवा परिणामाच्या विषयांत भलाबुरा चकारहि उच्चारीत नसत. अशा स्वभावाच्या दीर्घ परिचयामुळेंच आतां त्यांचे अनुभव आणि व्यक्तिविषयक रोखठोक अभिप्राय अनेकांना चमत्कारिक वाटत असावेत. कॉंग्रेसच्या नेत्यांपैकी महात्माजी, पं. नेहरू, श्री. राजेंद्रबाबू, श्री. पट्टाभि सीतारामय्या, प्रभृतींची कालमर्यादित आत्मचरित्रें बाहेर पडलीं आहेत. प. वा. विठ्ठलभाई व वल्लभभाई या पटेलबंधूंचीं चरित्रें छापलीं गेलेलीं आहेत. ( वल्लभभाईंचें अपूर्ण आहे ) कॉंग्रेसच्या चळवळींत चिकाटीनें शेवटपर्यंत राहिलेल्या किंवा कॉंग्रेसच्या प्रमुख नेत्यांशी जुळत नाहीं म्हणून त्या संस्थेच्या क्षेत्राबाहेर पडून विरोधकांची भूमिका स्वीकारलेल्यांचींहि आत्मचरित्रें लोकांच्या ऐकण्यांत पहाण्यांत आहेत; परंतु त्याच्यातील मजकुराचा फारसा गवगवा झाला नाहीं अगर नव्हता. मग आजादांच्या आत्मकथेंत असें काय नवल भरलेलें आहे कीं, त्याची चर्चा सुरू व्हावी ? वस्तुतः कॉंग्रेसमधील ठळक ठळक पुढाऱ्यांच्या स्वभावाची व कर्तृत्वाची पारख असलेल्यांना आजादांच्या तत्संबंधीं स्पष्टोक्तीचें नवल मुळींच भासणार नाहीं.

स्वराज्य मिळतांच हिंदुमुसलमानांच्या कत्तली सर्वत्र माजल्या, त्या थांबाव्या या उद्देशानें म. गांधींनी उपवास आरंभला. त्यावेळीं 'महात्माजी जर माझें ऐकत नाहींत तर मी तरी त्यांचें कां ऐकावें ?' असें बोलून वल्लभभाई दिल्लीबाहेर पडले. वल्लभभाईंच्या कर्तृत्वाची सर्वथैव घडण म. गांधींनीं केलेली होती ! महात्माजींचें हे उपकार स्मरून वल्लभभाईंनीं गुरूच्या उपोषण प्रसंगीं दिल्ली सोडायला नको होती आणि वरील प्रमाणें उद्गार काढायला नको असा हा प्रसंग नमूद करण्यामागें मौलानांचा रोख आहे. वल्लभभाईंच्या या वागणुकीचें आश्चर्य वाटणारांनीं स्वराज्य मिळाल्याबरोबर वल्लभभाईंनीं लखनौस एका भाषणामध्यें 'आम्ही महात्माजींचे होयबा अनुयायी नव्हे' असें म्हटल्याचें आठवावें. स्वराज्यांतील अधिकारानें वल्लभभाईंची वृत्ति बदलल्याची ही साक्ष वृत्तपत्रें चाळल्यास आज उपलब्ध होणें कठिण नाहीं. मौ. आजादांना महात्माजींच्या उपोषणाची वल्लभभाईंनीं क्षिति बाळगली नाहीं, याचा अचंबा वाटल्यासारखें त्यांनीं वल्लभभाईंच्या वागणुकीचें वर्णन केलें आहे. 'गांधींनीं हातीं धरण्यापूर्वी वल्लभभाईंना कसलेंच स्वतंत्र जीवन नव्हते. एक वकील एवढाच त्यांचा समाजांत दर्जा होता.' असें मत आजादांनीं वल्लभभाईंबद्दल एकदोन ठिकाणीं आत्मकथेंत दाखल केलेले आहे. गांधींच्या मताचा प्रतिध्वनि काढण्यापलीकडे वल्लभभाई कांहीं करीत नव्हते, अशीहि मौलानांनी पुस्ती जोडली आहे. म. गांधींनीं वल्लभभाईसारखी शेकडों माणसें हाताशीं धरली असून वल्लभभाईंची योग्यता त्यापैकीं एकालाहि लाभली नाहीं, या परिणामावरून कबूल करावे लागणारे वल्लभभाईंचे उपजत गुणविशेष मौ. आजादानांहि मान्य असतील; परंतु त्या गुणविशेषांच्या उपयोगाची संधी महात्माजींमुळें वल्लभभाईंना मिळाली, याच्या जाणिवेनें पूर्वी सुचविलेला अचंबा मौ. आजादांच्या हृदयाला छेडून गेला, असा ग्रह पत्करावा लागतो. म. गांधींच्या वधाची जबाबदारी वल्लभभाईंच्या माथीं कॉंग्रेसच्या गोटांतील कांहीं जणांनीं लादली; पर्यायानें हाच ध्वनि आजादांच्या लेखनांत आहे. आणि त्यावरूनच पटेलांवर उडालेला हा शिंतोडा पुसण्याचा यत्न वृत्तपत्राच्या द्वारें करण्यांत आला. महात्माजींच्या वधानंतर तीन चार तासांनीं रेडियोवरून मंत्र्यांचीं जीं शोकपर भाषणें देशभर फेकली गेलीं त्यांतल्या पटेलांच्या भाषणाचीं एक दोन वाक्यें स्मरणीय आहेत. 'महात्माजींचा एखाद्या प्रवासप्रसंगीं जीव जाता तर बरें झालें असतें.' अशा रोखाचें त्यांचें वाक्य, महात्माजींच्या मृत्यूनें नव्हे तर वधानें वल्लभभाईंना आपल्यावर होणाऱ्या वृथारोपाची जाणीव करून दिली असें समजावें लागते. आजादांच्या आत्मकथेंतील हा भाग उदाहरणादाखल किंचित् चर्चेस घेतला आहे--

मौलानांच्या आत्मकथेचा मुख्य विशेष म्हणजे थोडक्यांत पुष्कळ अर्थ व्यक्त करणें हा होय विस्ताराच्या अभावीं योजले जाणारे शब्द वाचकाचें ज्ञान, समजुती वगैरे बुद्धीचें भांडवल ज्या स्वरूपाचें असेल त्या स्वरूपाचा अर्थ काढण्याला संवड देतात. आजादांच्या टीकेंतून गांधी, नेहरू ( हे त्यांचे जीवश्च कंठश्च मित्र असूनहि ) सुटलेले नाहींत. आजादांचा ज्या कारभाराशीं व व्यक्तीशीं संबंध आला त्यांविषयींच त्यांनीं लिहिलेलें आहे. येथें हें सांगून ठेवणें अवश्य आहे कीं, कॉंग्रेसमध्यें राहिल्यानें मोठेपणा मिळालेल्या चिल्लर व्यक्तींची आजादांनीं उपेक्षा केली आहे. आजादांच्या संक्षेपवृत्तीनें त्यांच्यावर कोणी घमेंडखोरीचा, तर कोणी वस्तुस्थितीच्या विपर्यासाचा आरोप केलेला आहे. तथापि त्यांनीं सादर केलेल्या वृत्तांताचा खरेखोटेपणा पडताळण्याचीं साधनें आज भारताच्या गांधीकालीन राजकीय साहित्याच्या बाजारांत थोडी थोडकीं नाहींत. शिवाय म. गांधींच्या नेतृत्वाचा काळ अंधुक होण्याइतका दूर गेलेला नाहीं. ज्यांनीं म. गांधींची चळवळ पाहिली, अनुभवली व तिच्यासंबंधाचें वाङ्मय अभ्यासलें—किंबहुना ( कदाचित् ) राखून ठेवलें अशा साऱ्याच व्यक्ति अद्यापि मृत्युमुखीं पडलेल्या नाहींत. अजून कॉंग्रेसच्या कारभाराचे कागद आणि कॉंग्रेस पुढाऱ्यांचा पत्रव्यवहार उजेडांत येण्याची आशा आहे. म. गांधीसकट कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांच्या कामगिरीचें स्वतंत्र पूर्वग्रहशून्य पद्धतीनें स्वरूप न्याहाळून लोकांपुढें ठेवण्याचा काळ यावयाचा आहे व त्या काळांत आजादांचें हें छोटेखानी पुस्तक मार्गदर्शक झाल्याशिवाय रहाणार नाहीं.







# परमेश्वर आणि मी

हजारों वर्षें मानवानें जंग जंग पछाडले. पण या सृष्टीच्या सर्वशक्तिमान नियंत्याच्या अस्तित्वाचें गूढ अजून तरी त्याला उकललेलें नाहीं. थोर भक्तजनांना साक्षात्कार झाल्याचें दाखले आहेत आणि सर्वसामान्यांच्या जीवनांत कधीं कधीं अतर्क्य अशा घटना घडून येतात आणि हें गूढ अधिकच गहन होतें. दीपावलीतर्फे महाराष्ट्रांतील विविध क्षेत्रांत अग्रमार्गी चनकमान्य कर्तृत्ववान व्यक्तींपासून तों समाजाच्या खालच्या थरांतील व्यक्तींना या विषयाबाबत एक प्रश्नपत्रिका पाठविण्यांत आली. ही प्रश्नपत्रिका पुढें दिलीच आहे. या उपक्रमाला सर्वांनीं मोठ्या आपुलकीचें सहकार्य दिलें. या उत्तरपत्रिकांतील निवडक अशा काहीं पत्रिका दरमहिन्यास आम्ही वाचकांना सादर करणार आहोंत.

**– आमची प्रश्नपत्रिका –**

१—आपला परमेश्वरावर विश्वास आहे का ? असेल तर कां ? नसेल तर कां नाहीं ?

२—आपला धर्मावर विश्वास आहे का ? असेल वा नसेल ? तर काय म्हणून ?

३—आपण प्रतिदिनीं पूजा वा प्रार्थना ह्यापैकीं कांहीं नियमितपणें करतां काय ? आपण एखाद्या धार्मिक पुस्तकाचें वाचन करतां काय ?

४—आपणांस दैवी अथवा अतिमानवी, म्हणजे ज्याचें स्पष्टीकरण सर्वसामान्य तर्कान्वयें देतां येत नाहीं, असा कांहीं अनुभव आलेला आहे काय ?

५—वरील प्रश्नांशिवाय मानव आणि परमेश्वर यांच्या परस्पर संबंधासंबंधी आणखी कांहीं सांगू शकाल का ?

## *न. वि. गाडगीळ*



महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध कॉंग्रेस कार्यकर्ते. राजकारण आणि समाजकारण यांच्या जोडीला साहित्याची मनापासून आवड आणि मराठीचें एक दर्जेदार लेखक. आज पंजाबचे राज्यपाल.

---

**प्रश्न १ :** परमेश्वर अगर तत्सम कांहीं शक्ति आहे असें वाटतें. या वाटण्याला श्रद्धा अगर विश्वास असें म्हणतां येईल. हा कां आहे याचें उत्तर अनेक प्रसंगीं आलेले अनुभव हा आहे. ६३ वर्षांच्या आयुष्यांत अशा कांहीं घटना घडल्या आहेत कीं त्या घडण्याच्या मागे कांहींही मानवी प्रेरणा अगर प्रयत्न नव्हते. तथापि घडले त्यामुळें मानवव्यतिरिक्त अशी कांहीं शक्ति आहे असेच म्हणावें लागेल. निदान विद्यमान ज्ञानाचे दृष्टीनें हे म्हणणें प्राप्त आहे याचा अर्थ असा नव्हे कीं माणसाचे जीवनांत सर्व अपरिहार्य आहे व त्याला क्रिया स्वातंत्र्य नाहीं.

**प्रश्न २ :** धर्म यांत दोन गोष्टींचा समावेश होतो. एक आध्यात्मिक भाग व दुसरा वर्तन क्रम. आध्यात्मिक भावाबद्दल वरच्या उत्तरांत अवश्य तेवढे सांगितलेले आहे. व जो वर्तनविषयक भाग आहे तो सापेक्ष नीति मूल्यावर आधारलेला असतो. देशकाल परिस्थितीप्रमाणें त्यांत बदल होत असतो. वर्तनक्रम समाजाच्या विद्यमान मूल्याला अनुसरून असावा असे माझे मत आहे व त्यांत होणारा बदल क्रमाने व्हावा व या दृष्टीने धर्म मी मानतो. धर्म विषयक शाश्वत मूल्यें अशी जी कांहीं आहेत त्यावर अर्थात विश्वास आहे.

**प्रश्न ३ :** प्रत्यक्ष पूजा करीत नाहीं. प्रार्थना व तत्पूर्वीं दिवसांतील एकंदर हकीकतीचे समालोचन मनाशी करतो. आपल्या ध्येयानुसार वर्तन झालें कं नाहीं याचा विचार त्यांत असतो व त्यामुळें आदर्शाची जाणीव नित्य होते. ज्ञानेश्वरी, दासबोध व तुकारामाची गाथा यापैकी निदान एक तरी घरी प्रवासांत असतांना, निजण्यापूर्वीं नियमाने वाचतो.

**प्रश्न ४ :** असा अनुभव आलेला आहे. दोन उदाहरणे देतो.

१९१६ साली ज्युनिअर बी. ए. ला असतांना ज्या घरांत राहात होतो ते घर जुनाट होते व एके रात्रीं कांहीं तरी वरून पडले असा आवाज झाला त्यापूर्वीं एका स्त्रीने स्वप्नांत येवून जागा हो, डोक्याशीं काय आहे ते पहा असे म्हटलें. वाक्य संपताच आवाज झाला. त्यावेळीं संशयवादी मनोवृत्ति होती स्वप्न कांहीं तरी आहे, वरून कांहीं तरी जुनाट घर असल्याने पडलें असेल कशाला उठा, दिवा लावा असा विचार आला. पण उठून पाहिलें तर काय बिघडले असे म्हणून उठलो. दिवा लावला, आणि पाहातो तो उशापासून दोन इंचाचे अंतरावर मोठा विंचू अगर इंगळी नांगी वर करून उभी आहे असें दिसलें. ताबडतोब तिला मारलें हें खरें पण किती दिवस तरी हें क घडलें याचा खुलासा करता येईना. स्वप्नांत येणारी व्यक्ती कोण याचाहि विचार करता येईना. आई चार वर्षांचा असतांनाच वारली. तिचा चेहरा अगर फोटो पाहिला नाहीं. कदाचित् ती असेल म्हणून वडील मंडळीना विचारले पण त्यांनी दिलेल्या वर्णनांत व स्वप्नांतील बाईंत साम्य दिसले नाहीं. दुसरा अनुभव गाडीमध्यें हल्ला झाला त्या वेळचा आहे. त्याचे वर्णन ५३ जूनच्या केसरीच्या अंकांत केलें आहे. ' काय तो सोहळा वर्णू आता

अनुक्रमणिका

## नटवर्य नानासाहेब फाटक



महाराष्ट्राचे अभिनयकुशल नटसम्राट. मराठी रंगभूमीवर त्यांचे फार मोठे ऋण आहे. या वर्षी हैद्राबाद नाट्य संमेलनाचे अध्यक्ष निवडून महाराष्ट्रानें त्यांचा यथोचित गौरव केला. हल्लीं मराठी नाट्यपरिषदेचें काम आणि नाट्य व्यवसाय.

दीपावली ह्या नवीन मासिकाच्या संपादकानीं परमेश्वरासंबंधीं पांच प्रश्न विचारले आहेत, आणि पत्राचे शेवटीं अत्यंत थोडक्या शब्दांत त्या प्रश्नांची उत्तरें लिहावीं असें प्रामुख्यानें सुचविलें आहे. ज्याच्या अस्तित्वाविषयीं व साक्षात्काराविषयीं संस्कृतांतील वेदांपासून तो जगांतील सर्व भाषांतून चर्चात्मक निबंध लाखों पानांनीं लिहिले गेले, त्याचें स्वतःला पटलेलें स्वरूप अगदीं थोडक्या शब्दांत कसें लिहितां येईल? ज्ञानवंताचे दृष्टीनें तें हास्यास्पद ठरणार नाहीं का?... व्यक्ति तितक्या प्रकृती. म्हणून मला काय वाटतें इतकेंच सांगण्याचा हा प्रयत्न आहे. सर्वांनाच तें पटेल असें कसें म्हणतां येईल?

वाढत्या वयाची चढण ओलांडून आतां उतरणीला लागल्यानंतर आपल्या आयुष्यांतील, क्षणोक्षणीं येणारे विविध प्रसंग व अनपेक्षीत जागतीक घडामोडी यांचें सिंहावलोकन केल्यानंतर, जागतीक समतोलपणा कायम ठेवणारी एक अदृश्य शक्ती आहे याची जाणीव मला पूर्णांशानें झाली आहे. मग त्याला निसर्ग म्हणा अगर निरनिराळ्या धर्मानुसार अनेक नांवें असलेला परमेश्वर म्हणा. माझे मातामह पूर्ण श्रद्धाळू ईश्वरभक्त असल्यानें त्यांच्या सहवासानें व शिकवणीनें लहानपणीं माझ्यावर जे संस्कार झाले आणि तरुणपणीं शोधकबुद्धिला जे अनुभव आले त्याचेंच हें प्रत्यंतर असावें. स्वामी विवेकानंदांचे ग्रंथ, गीता, बायबल, इत्यादी धर्मग्रंथ वाचल्यानंतर माझा आत्मा हाच परमेश्वर आहे असें मला वाटतें आहे. मनाला पवित्र वाटणारी कला, काव्य व शास्त्र यांच्या निर्मीतीनें मानवाला जो सात्विक आनंद होतो त्यांतूनच माझा आनंदमय परमेश्वर निर्माण झाला आहे. जगांतील प्रत्येक व्यक्तीचा परमेश्वर त्याच्या स्वतःपुरता अगदीं भिन्न स्वरूपांत असतो, असें मला वाटतें. ईश्वर निराकार-निर्गुण आहे हें सत्य आहे. तरी सामान्य माणसाला मानसीक रित्या त्याचें आकलन होत नाहीं. आणि म्हणून सुंदर-सगूण-साकार असें एक प्रतीक मूर्तिरूपानें तो समोर ठेवून आध्यात्मिक आनंदाची पहिली पायरी गाठतो. आपल्या हृदयांतला परमेश्वर तो समोर ठेवतो. माझ्या अंतःकरणातला परमेश्वर मातेच्या वात्सल्यानें माझ्याकडे पहातो आहे. आणि मी त्याच्यावर माझ्या लहान नातवाप्रमाणें निर्मळ निरपेक्ष प्रेम करतों आहें. पूर्वजन्मावर माझा पूर्ण विश्वास असल्याकारणानें या जन्मांत माझ्या हातून पूर्व कर्मानुसार कांहीं अपराध बुद्धीला नकळत घडले तर ती माझी दयाळू माता मजवर सांसारिक आपत्ती वगैरे आणून मला शिक्षा करील; पण प्रेम आटूं देणार नाहीं. आणि मी, माझ्या गोजिरवाण्या नातवानें मला त्रास होईल अशी कांहीं कृती केली तरी त्याच्यावर रागावेन काय? हिटलर मुसोलिनीसारखा माझा परमेश्वर डिक्टेटर नाहीं कीं त्याच्या आज्ञेचें पालन मी केलेंच पाहिजे; व ज्यांचें छायाचित्र घरांत ठेवून त्याच्यापुढें रोज श्रद्धेनें मान लवविलीच पाहिजे. माझ्या देवानें मला पूर्ण स्वातंत्र्य दिलें आहे. आणि या देणगीतच माझ्या श्रद्धेचा उगम आहे. मला परमेश्वराची भीति कधींच वाटत नाहीं. आणि दिवस रात्रीपैकीं कोणत्याही आनंदाच्या क्षणीं दृष्टीनें नीतिबाह्य असलेलें कसलेंही कृत्य करीत असतानां मला त्याचें आनंदमय स्मरण झाल्याशिवाय रहात नाहीं. देहाबरोबर देहधर्म हे भोगलेच पाहिजेत. परमेश्वरी प्रेमाशीं सामाजिक नीतिमत्तेची सांगड घालूं नये असें मला वाटतें. प्रत्येक मानवाच्या जन्मजात प्रकृतीप्रमाणें त्याचीं नीतितत्वें निरनिराळीं असतात. असा माझा अनुभव आहे. भीतीनें रोज पूजाअर्चेचे अवडंबर माजवून, व्रतवैकल्यें व उपासतापास करून आपल्या बरोबर आपल्या लहान बालकांना व आप्तेष्टांना ती करायला लावून, त्यांना त्रास देणारे लोक पाहिले, म्हणजे ते भित्रे व पापी असावेत कीं काय अशी शंका मनांत आल्यावांचून रहात नाहीं. आजकाल समाजांत बोकाळलेली बुवाबाजी व अंधश्रद्धेनें चाललेली विभूतीपूजा यावरून समाजांतील लोकांच्या मनाची आध्यात्मिक पातळी सहज समजून येते. योग विद्येनें अथवा असीम भक्तिमार्गानें परमेश्वरी साक्षात्कार होतो असें म्हणतात. या दोन्हीही मार्गांचें अवलंबन करण्याइतका वेळ जीवनधारणा करण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या यातायातीमुळें मला आजपर्यंत मिळाला नाहीं पण परमेश्वरी साक्षात्कार जागतीक स्वरुपांत अल्पसा का होईना, मला दिसला आहे. निसर्गातील सागरावर मानवानें विजय मिळविला आहे अशा दर्पोक्तीनें सागरांत सोडलेली 'टिटॅनिक' आगबोट अगदीं पहिल्या सफरीच्या वेळीं कां बुडावी? अभेद्य ठरलेलें 'झेपलिन' विमान पहिल्या उड्डाणांत जळून कां जावें? माझ्या आयुष्यांत दोन महायुद्धें झालेली मी पाहिलीं. आपल्या देशाला मिळालेलें स्वातंत्र्य पाहिलें. या सर्व घडामोडीवरून मला हा साक्षात्कार झाला कीं शास्त्रानें मानवी आकांक्षा कितीही उंचावल्या असल्या तरी त्यांना नियंत्रण घालून जगाचा समतोलपणा (इकविलिब्रिम) कायम ठेवारी एक न्यायनिष्ठूर शक्ति आहे. आणि ही शक्ति नेहमीं कोणत्या ना कोणत्या रूपानें अवतार घेत असते. प्रकट होत असते.

विश्वांत जे युगप्रवर्तक व शककर्ते महापुरुष होऊन गेले त्यांच्या तत्कालीन कृतीकडे अथवा शिकवणुकीकडे अंधश्रद्धेनें न पहातां ज्ञानचक्षूनें पाहिलें तर असें दिसून येतें कीं कोणीतरी नियंत्रण करणारी शक्ति जगाची विस्कटलेली घडी पुन्हां घालण्याच्या प्रयत्नांत आहे. मग त्यांना ईश्वराचे अवतार असें कां म्हणू नये? मानवाचा व ईश्वराचा संबंध अशा रूपानें येत असावा असें मला वाटतें. आनंदमय परमेश्वराची मानवी अंतःकरणांत थोडी जरी जागृती व जाणीव असली तर अनेक जन्म घेऊन पायरी-पायरीनें परिणत झालेल्या आत्म्याला परमेश्वराचा – त्या चिरकालीन आनंदाचा— लाभ होईलच, असें मला वाटतें.

• • •

## महेंद्र कुलश्रेष्ठ

सांस्कृतिक चळवळींशीं निकट संबंध असणारे हिंदीतील चतुरस्र लेखक. वेदमूर्ति पं. सातवळेकर यांचा ९१ वा वर्धापदिन साजरा करण्यांत हेच प्रमुख होते. अर्थशास्त्र आणि राजकारण यांचीहि आवड. हल्लीं भारतीय विद्याभवनचे असिस्टंट रजिस्ट्रार.

एका विद्वान गृहस्थाच्या बाबतींत असें सांगतात कीं त्यांनीं **ईश्वराची सत्ता** या विषयावर बारा व्याख्यानं दिलीं. शेवटच्या दिवशीं तर त्यांनीं सांख्ययोग वगैरे बाजूनीं आपल्या विषयावर प्रकाश पाडला. त्यांच्या





प्रभावी वक्तव्यानं भारावून गेलेला श्रोतृगण वाहवा वाहवा म्हणत होता. या श्रोत्यांपैकीं एकानं वक्त्याला विचारलं " महाराज ईश्वराच्या बाबतींत तुमचा स्वतःचा व्यक्तिगत अनुभव काय आहे ? " विद्वान वक्त्यानं क्षणभर विचार केला आणि सांगितलं 'दादा मला या बाबतींत कसलाच अनुभव नाहीं.'

थिऑसॉफिस्ट जे. कृष्णमूर्ती असं म्हणतात कीं ईश्वर ही आपली एक कल्पना आहे. त्याचा उगम मानवाच्या डोक्यांतून झाला आहे. आमच्या ह्या संसारांत अगणीत दुःखं आहेत, व्याधी आहेत. संकट आहेत. या दुःखांची व्याधींची तीव्रता मनुष्याला तो पशु असता तर एवढी जाणवती ना ! पण मनुष्य हा विचारशील प्राणी असल्यामुळें तो विचार करून आपली दुःखं-संकटं वाढवीत असतो. त्यांची तीव्रता वाढवीत असतो. आणि मग त्या संकटांवर उतारा म्हणून त्यानं सर्वसत्ताधिश, 'कर्तुमकर्तु अन्यथा कर्तुम्' अशा ईश्वराची प्रतिष्ठापना केली. व त्या राजाच्या आधिपत्याखालीं तो सुखानं राहूं लागला.

व्यक्तिशः मला जें कृष्णमूर्तींचे वरील विचार मला मान्य आहेत. संसारांत पुष्कळदां संकटं आली त्यावेळीं मला कुणाच्यातरी आसऱ्याची आवश्यकता होती. आणि सर्वशक्तिमान् परमेश्वर माझा पाठीराखा आहे त्या कल्पनेने मला समाधान वाटलं. मी त्या संकटांतून पार पडूं शकलों. संकटसमयीं जेव्हां इतर कुणी आपल्या मदतीला येत नाहींत आणि असं बहुशः घडलं — तेव्हां आपलं मन, बुद्धीची टोचणी बुध्याच बाजूला लोटून ईश्वराच्या मदतीची अपेक्षा करतं. आपली बुद्धी त्या मनाला आवरूं शकत नाहीं. आपणाला कुणाच्यातरी आसऱ्याची आवश्यकता असते. आपल्या अंतर्मनातून कुणीतरी जोराजोराने सांगत असतं कीं ईश्वराची सत्ता मान्य केलीच पाहिजे. आणि मी ती मान्य केलीही.

पण आतां वारंवार संकटं आल्यानं माझं मन थोडसं निर्ढावलेलं आहे. आतां तें ईश्वराची आठवण करीत नाहीं. असं वाटतं ईश्वर नसताच तर प्रश्नच मिटला पण जर तो असला तर वारंवार हाक मारून जो उत्तर देत नाहीं त्याचं परत परत स्मरण करण्यांत तरी काय अर्थ !...आणि आतां व्यावहारिक जीवनामध्यें मी पूर्वीपेक्षां जास्त सुखी आहे.

मानवाची तीव्र जिज्ञासा व शोधकवृत्ती यामुळें कधी ना कधी तो ईश्वराच्या मकाणापर्यंत जाऊन त्या मकाणांत कोण आहे किंवा नाहीं व असल्यास कशा प्रकाराचा आहे त्याचं सामर्थ्य काय आहे तो विकारी आहे की अविकारी वगैरेचा शोध लावील.

( १ ) पहिल्या प्रश्नाचं उत्तर हें असं आहे. आणि अजूनही तें फार दूर आहे. इतकं ओरडूनही मी तुमच्या प्रश्नाचं समाधानकारक उत्तर दिलं असं मला वाटत नाहीं.

( २ ) एकाकाळीं धर्माची आवश्यकता होती. पण आज नाहीं. 'चिंतन' हें धर्माच्या सीमा ओलांडून पुढें गेलेलं आहे. मात्र धर्म समाजाच्या एकत्रीकरणाला उपयोगी पडतो. पण सर्वव्यापी एकत्रीकरणास हाच धर्म बाधक ठरतो. ईश्वर किंवा सत्य हें धर्माच्या छोट्या कुंपणांत रहात नसून तें बाहेर उघड्या आकाशांत विराजत असतं. अर्थात् आपणही आपली बुद्धी वे अनुभूती इतकी व्यापक केली पाहिजे. ईश्वर म्हणजे ब्रह्म. म्हणजेच विशाल विशाल तर.

( ३ ) मी स्वतःच जर ईश्वराचा एक अंश आहे तर मग मी माझीच पूजा कशी करूं ? जीवनामधें त्याला पूर्णत्वानें जाणणें म्हणजेच त्याची खरी पूजा करणं होय. आमची स्वतंत्र बुद्धी हेंच शेवटचं धर्म पुस्तक आहे. आणि त्या बुद्धीच्या द्वारें त्याला ओळखलं पाहिजे.

( ४ ) असे कांहीं अनुभव असतात. माणसाच्या बुद्धीप्रामाण्याच्या दृष्टीनें उत्तर देणें कठीण आहे ! माझ्या जीवनांत सर्व महत्वाच्या घटना दोन वेळा घडलेल्या आहेत. माझा जन्म २ ऑगस्टला झाला, २ वेळां मरणाच्या दुःखण्यांतून वाचलों, मी ज्या घरांत रहातो त्यांचा नंबर नेहमी २ असतो. ( २ - बूचा टेरेस, जुहू; २ वसंत महल, मरीनड्राइव्ह, २ अटल रोड लखनऊ ) माझा खिसाही २ वेळां कापला गेला आहे ( हसूं नका ) आणि प्रेमाच्या बाबतींत बोलायचं झालं तर तेंही मला २ वेळां करावं लागलं. पण ह्या साऱ्याचा आणि त्या ईश्वराचा कांहीं संबंध नाहीं. त्याचा संबंध जीवनाशीं आहे, आपल्या अज्ञात भूतकाळाशीं आहे व आपल्या जन्मापासून मृत्यूपर्यंत सर्व लहान मोठ्या गोष्टीवर त्याचा परिणाम होणार आहे. यालाच आपण '**भाग्य**' म्हणतो. ह्या भाग्याची व्याख्या माझ्या मतें शास्त्रीयदृष्ट्या अजून कोणी केली नाहीं. अर्थात् भविष्य काळांत कोणीतरी ती करीलच आणि त्यावेळीं आपल्याला ह्या गोष्टीचं रहस्य कळूं शकेल. • •




दीपावलीचा प्रस्तुत मासिक स्वरूपाचा अंक रसिक वाचकांच्या हातीं देतांना मला अत्यंत आनंद होत आहे. गेलीं चौदा वर्षें अव्याहत केलेल्या सेवेला रसिकांनीं अनुकूल असा कौल दिल्यामुळेंच हें धाडस करण्याचा मोह होत आहे. दीपावली वर्षिकाचें मासिकांत रुपांतर करा अशी आग्रहाची मागणी वाचकांकडून आणि लेखकमित्रांकडून सतत होत होती. पण मासिकाचा खटाटोप फार मोठा असतो आणि मासिक सर्वांगसुंदर काढायचें तर सर्वश्रेष्ठ लेखकांच्या साहाय्याची नेहमींच आवश्यकता असते. पण सांगायला आनंद वाटतो कीं मराठी साहित्यांतील आघाडीवर असणाऱ्या माझ्या कांहीं लेखक मित्रांनीं नियमितपणें भरघोस साहाय्य देण्याचें कबूल केलें आणि सर्वश्री पु. भा. भावे, भाऊसाहेब जोगळेकर, ग. दि. माडगूळकर, बाळ सामंत, गोपाळकृष्ण भोवे या मित्रांनीं तर चक्क 'श्रीगणेशा' पासून दीपावलीची आंखणी केली. आणि त्यामुळेंच या स्वरूपांत हा अंक सादर करता आला. वाचकाला यांत जें जें कांहीं नवीन आणि चांगले आढळेल त्याचें सर्व श्रेय माझ्यावर अकृत्रिम प्रेम करणाऱ्या या लेखक मित्रांचें व इतर सर्व सहाय्यकांचे आहे. मात्र यांतील उणीवा आणि अपुरेपणा याची जबाबदारी माझ्यावर आहे. याशिवाय सर्वश्री मं. वि. राजाध्यक्ष, अच्युत बर्वे, ग. रा. कामत, टॉम अँड बे चे श्री. ग. वि. तांबे, बॉंबे प्रोसेसचे श्री. मोहनराव कामत आणि श्री. स. दाभोळकर यांचेहि वेळोवेळीं फार मोठें साहाय्य झाले आहे.

या अंकांतील उणीवा आणि दोष दूर करण्याची फार मोठी उमेद आहे. पण याची सारी भिस्त लेखक, वाचक, जाहिरातदार आणि वृत्तपत्रविक्रेते यांच्या सहकार्यावरच आहे, जें मला सातत्यानें गेली चौदा वर्षें मिळालें आहे !

— दीनानाथ दलाल

## साहित्य

**श्री. चिंतामण गणेश कोल्हटकर.**

१९५५ ते १९५७ या मुदतींत चौदा प्रादेशिक भाषांत प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांचा विचार करून, प्रत्येकीं पांच हजार रुपयांच्या पारितोषकाकरितां ज्या दहा ग्रंथांची साहित्य आकादमीनें निवड केली त्यांत श्री. चक्रवर्ती राजगोपालाचारी यांनीं तामीळ भाषेंत केलेला रामायणाचा गद्य अनुवाद, कन्नड कवि श्री. बेंद्रे यांचा कविता-संग्रह, श्री. राहुल सांस्कृत्यायन यांचा मध्य आशियाचा हिंदींत लिहिलेला इतिहास आणि नटवर्य श्री. चिंतामणराव कोल्हटकर यांचा 'बहुरूपी' हा मराठी ग्रंथ यांचा समावेश झालेला आहे. एखाद्या भाषेंत प्रसिद्ध झालेल्या अनेक ग्रन्थांपैकीं सर्वोत्कृष्ट ग्रन्थ कोणता हें ठरविण्याचें कार्य कांहींसें धाडसाचेंच समजलें पाहिजे. रामायणाच्या अनुवादासारखें भाषांतर, बेंद्रे यांच्या कविता, राहुल सांकृत्यायनांनी लिहिलेला इतिहास आणि कोल्हटकरांचें 'तथाकथित' आत्मचरित्र अशा निरनिराळ्या जातीच्या पुस्तकांचा जसा या यादींत समावेश झाला आहे, त्याहीपेक्षां जास्त जातीची पुस्तकें तीन वर्षांच्या काळांत कोणत्याही भाषेंत लिहिली जाण्याचा संभव आहे. अशा निरनिराळ्या जातीच्या ग्रंथांतील सर्वोत्कृष्ट ग्रंथ निवडण्याची करामत निवड समितीच्या वैयक्तिक आवडी-निवडीवर अवलंबून राहण्याचा संभव असतो. परंतु चिंतामणरावांचा 'बहुरूपी' हा मराठी भाषेंतला एक उत्तम ग्रंथ असल्यामुळें, त्याला मिळालेल्या पारितोषकाबद्दल त्यांचें अभिनंदन करणें अवश्य आहे. चिंतामणराव हे प्रचलित अर्थानें साहित्यिक नाहींत, इतकेंच नव्हे तर, 'बहुरूपी' हा त्यांचा पहिलाच ग्रन्थ आहे ! लेखणीच्या पहिल्याच फटकाऱ्यासरशीं अखिल राष्ट्रीय दर्जाचें पारितोषक मिळाल्यामुळें चिंतामणराव विशेष अभिनंदनास पात्र झाले आहेत. एक उत्कृष्ट नट आणि दिग्दर्शक असा चिंतामणरावांचा लौकिक असून, गेल्याच वर्षी उत्तम अभिनयासाठीं त्यांना राष्ट्रपति पारितोषक मिळालें होतें. चिंतामणरावांची सर्व हयात रंगभूमीवर गेलेली आहे. 'महाराष्ट्र' आणि 'भारत' या गद्य नाट्यसंस्थांत त्यांच्या कारकीर्दीची सुरवात झाली. 'किर्लोस्कर' नाटक मंडळींत असतांना गडकऱ्यांच्या पुण्यप्रभावांतली वृंदावनाची भूमिका करण्याचा पहिला मान त्यांना मिळाला आणि त्यानंतर स्वतःच्या "बलवंत नाटक मंडळींत" त्यांनीं 'घनःशाम', 'मातंग युवराज' आणि 'लक्ष्मणसिंह' या भूमिका केल्या. त्यांना लिहायला-वाचायला मराठी रंगभूमीनें शिकविलें नसलें, तरी त्यांच्यांतील उपजत साहित्यगुणांची जोपासना मराठी रंगभूमीवरच झाली यांत संशय नाहीं. सबब, चिंतामणरावांचा गौरव म्हणजे मराठी रंगभूमीचाच गौरव आहे असें समजलें पाहिजे.



अनुक्रमणिका

### “आमची हेटाळणी तरी करूं नको”

गेल्या जानेवारी महिन्यांत बडोदे येथें भरलेल्या मराठी वाङ्मय परिषदेच्या चाळीसाव्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणांत सुप्रसिद्ध लेखक, श्री. पु. भा. भावे, म्हणाले, “आमच्या नव्या लेखकांना जे खरोखर उघडेनागडें, रसहीन, भावनाहीन, परिणामहीन तें सारें परिणामकारक, आनंददायक, सूक्ष्म आणि सुंदर वाटतें. बऱ्यावाईटाची सारीं मूल्येंच उलटीपालटी करण्याचा या नव भागवत पंथाचा प्रयत्न आहे. गंगेऐवजीं गटार हेंच कलेचें महान तीर्थस्थळ, असें सिद्ध करण्याचा त्यांचा अट्टाहास आहे.” नवलेखकांवर अशा प्रकारचा हल्ला चढविल्यावर अखेर सामोपचाराचें धोरण स्वीकारून श्री. भावे म्हणाले, “केवळ शरीरवर्णनाकडून नवलेखक मनोविश्लेषणाकडे वळले हा प्रगतीचा केवळ एक टप्पा झाला. परंतु, अगदी याच हिशेबानें त्यांनी या लोकाकडून परलोकाकडे, अर्थाकडून परमार्थाकडे, आत्म्याकडून परमात्म्याकडे वळलें पाहिजे. हें जग केवळ छायेचें नाहीं तर प्रकाशाचेंही आहे, केवळ थिटेपणाचें नाहीं तर भव्यतेचेंही आहे, अधर्माचें नाहींतर धर्माचेंही आहे. या धर्माचें, या उत्तुंगतेचें या प्रकाशाचें दर्शन घडविण्याचा प्रयत्न आमच्या नवलेखकांनीं केला पाहिजे.” परंतु असें झालें तर नवलेखकांची नवीनताच कदाचित नाहींशी होण्याचा संभव आहे असें श्री. भावे यांना वाटलें असावें म्हणून ते म्हणाले, “निदान ही कठिण तपस्या जे कोणी आचरित असतील त्या लब्धि लेखकांची हेटाळणी तरी आमच्या नवलेखकांनी करूं नये!”

—वसंत शां. देसाई

## सत्यं शिवं सुंदरम्

### चित्रविचित्र प्रदर्शनें

१९५८ पासून आजतागायतपर्यंत अनेक चित्रकला प्रदर्शनें झालीं. कांहीं एकहाती तर कांहीं संस्थांतर्फे. ‘बॉम्बे आर्ट सोसायटी’ व ‘आर्ट सोसायटी ऑफ इंडिया’ ह्या दोन मान्यवर अशा स्थानिक संस्था. ह्या दोन्हीं संस्थानींही आपलो वार्षिक प्रदर्शनें उरकून घेतलेलीं आहेत.

हीं सर्व प्रदर्शनें पाहून अधिकाधिक नाविन्याची चटक लागलेल्या मनाला निर्मळ अशी प्रसन्नता वाटली नाहीं. अनेक माध्यमांतून चित्रण केलेले अनेक प्रकार आढळले, प्रतिमा चित्रें, भाववाचक चित्रें, आरेखन, स्थिर चित्रण, निसर्ग, त्रिमिति, घनता, रूपशीलता इत्यादि अनंत प्रकार आढळले; परंतु समाधान झालेंच नाहीं. प्रेक्षकाला आपण कुठेंतरी त्रिशंकू सारखें लटकतों आहों असाच भास झाला.

कांहीं अगदीं थोडेच तपस्वी कलावंत सोडले तर बाकीच्या अधिकांश चित्रकारांच्या कलाकृतींतून दांभिकपणा मात्र पुरेपूर आढळला. कांहींतरी वांकडें तिकडें केलें म्हणजे आपण नव-चित्रकाराच्या पंक्तींत जाऊन बसतों, असा समज बऱ्याच कलाकृतींतून डोकावत होता. असें केल्यानें दैवयोगानें कदाचित् आपण पदकाचे मानकरी होऊं, अशीहि त्यामागें पार्श्वभूमि असेल कदाचित्; परंतु तें पाहतांना हास्यास्पद वाटत होतें. अशी ही वृत्ति कांहीं लोकांतच आढळली असें नव्हे, तर कांहीं जुन्या मान्यवर कलावंतांतही ती आढळली; परंतु सूज्ञ आणि जाणित्या प्रेक्षकांच्या दृष्टीनें त्यांचें व्हायचें तें हसें झालेंच. कांहीं तरी दिव्य आणि हृदयाला पीळ घालणारी अशी एकहि कलाकृति यंदाच्या कुठल्याही प्रदर्शनांत दिसली नाहीं. योग्य तपश्चर्येचा अभाव हेंच त्याला कारण आहे. उठसूट वांकड्या तिकड्या रेषा काढ आणि तें नवचित्रकलेच्या नांवावर खपव अशी बरीचशी प्रेरणा अलीकडे फोफावल्याची दिसते; परंतु ‘वस्त्रें पुरवणाऱ्यालाच वस्त्र हरणाचा खेळ शोभून दिसतो.’ ह्या सूज्ञ व्यवहाराची जाणीव त्यांना दिसत नाहीं.

एक गोष्ट मात्र निश्चित झालेली आहे कीं या नवनवोन्मेषामुळें मक्तेदारीचा संपूर्ण अस्त झालेला आहे. यापूर्वी ठराविक अशा वर्तुळांत सोसायटीचें सुवर्णपदक फिरे, नव्हे आधल्या वर्षी त्याचें निखालस भविष्यही वर्तवलें जाई; परंतु ताज्या दमाच्या कलावंतांनी त्यावर जबरदस्त प्रहार केलेला आहे. यावर्षीचें सुवर्णपदक दिलें गेलें नाहीं त्याला देखील वेगळीं कारणें नाहींत.

‘यापूर्वी सुवर्णपदकाचे मानकरी ठरलेल्या कांहीं मान्यवर कलावंतानींही आपलीं निराळीं अशीं एकहातीं प्रदर्शनें भरवलीं होतीं. अलमेलकर, गाडे, हुसेन, गायतोंडे, लक्ष्मण पै, सतीश गुजराल, श्री. प्रभा पति-पत्नी वगैरे; कांहींची प्रदर्शने चित्तवेधक होतीं; परंतु कांहीं ठिकाणीं प्रतिशार्थिक तोचतोपणा फार जाणवला.

व्यंगचित्रांचीं प्रदर्शनें दोन झालीं. ‘ठाकरे बंधू’ आणि ‘कदम’ यानीं या कलेंतलें आपलें आगळें वैशिष्ट्य दाखवलें. या बाबतींत बाळ ठाकरे उजवे आणि नेटके वाटले. मिस्किल अशी विनोद प्रचुरता त्यांच्या कुंचल्यांत जशी अधिक जाणवली तशी ती सफाईच्या बाबतींतही होती. व्यंग चित्रांच्या प्रदर्शनाचा हा पायंडा नवा नसला तरी आज प्रेक्षकांचा त्याला मिळणारा भरघोस पाठिंबा पाहून भविष्यकाल उज्वल वाटतो.

चित्रकला प्रांगणांतल्या या विराट विश्वाच्या दर्शनानें मन आशावादी बनतें; पण खटकतें ते एकाच ठिकाणीं, सरकारची असावी तशी कृपा दृष्टि या प्रांताकडे नाहीं. केवळ बक्षिसाच्या रूपानें तीस चाळीस हजार रुपये खर्च करून मोकळे झाल्याचा निःश्वास सोडून कांहीं हो नाहीं, आज रंगसाहित्य एवढें महागलेलें आहे कीं त्याला तोड नाहीं. प्रत्येक वस्तू आठ-प दहा-पट वाढलेली आहे. विद्यार्थी काय किंवा धंदेवाईक काय रंग साहित्यांतली एखादी वस्तु खरेदी करतांना त्यांच्या डोळ्यांत प्राण उभे राहातात. परवाना मिळत नाहीं या ध्रुवपदाव राहून मन मानेल तसे प्रत्येक वस्तूचे भा रोजचे वाढताहेत. येथील एका व्यापाऱ्यानें सर्व परवान्याचा एक हात करून मा मागवला आणि तोंडाला येईल त्या भावानें तो चित्रकलासाहित्य विकतो आहे. सरकारची दृष्टि इकडे वळेल अशी आशा बाळगायला हरकत नाहीं.

### सामवेदांतील गोंधळ

चित्रकलेच्या प्रांतांत सरकारची दृष्टि कांहीं बाबतींत शिथील असली, तरी सामवेदांतील प्रांतांत मात्र ती भरपूर वळलेली आहे. संगीतोत्सक, नृत्योत्सव, लोकनाट्योत्सव इत्यादि उत्सवानीं तें स्पष्ट झालेलें आहे.

या उत्सवामुळें प्रगति झालेली आहे, किंवा परागती होते आहे हा प्रश्न आलाहिदा, परंतु जिकडे तिकडे या प्रांतांत उत्साही वातावरण आढळतें. संगीतोत्सवानां तर भरती आलेली आहे. नित्य नवीं आकर्षणें चढाओढीनें दाखवलीं जाताहेत. हिन्दुस्थानांतलीं संपलीं तर









पाकिस्तानांतून, तिथून संपली तर सिलोन अफगाणिस्तान आदि परदेशांतूनही त्यांची आयात होतेच आहे. आणि कांहीं ठेकेदार समाधानींत तर कांहींचा बार फुसका ठरल्यानें असमाधानींत आहेत. हळूहळू कांहीं लोकांचा हा जोड धंदाही होऊं लागलेला आहे. पाकिस्तानांतून सलामत-नजाकत जोडी पुन्हा आलेली आहे. आणि त्यांनीं आपलें कंठवादन जोरांत चालू ठेवायची खटपट चालवलेली आहे. सूरसिंगार संसदेतर्फे गेल्या १५ तारखेला त्यांचा झालेला जलसा अगदींच भिकार होता. त्यांच्या गायकींत नायकी वाटतच नाहीं. एकच सूर दोन तीन मिनिटें आंदोलित ठेवून वेळकाढू धोरणानें गाणें वाढवणेंआणि शेवटीं अफाट वेफाट अशी–बेलय –तानेची कसरत करणें हें त्यांचें गाणें. आणि आमचे लोक त्याला मनमोकळी दाद देतात! आपण कितीही विरुद्ध कोकललों तरी शेवटीं जनताजनार्दन सर्वश्रेष्ठ आहे. त्यांनीं दाद दिली, गाणें उत्तम! एकट्या दुकट्या टीकाकारानें 'तें सच्चें नाहीं,' हें कितीही आक्रोश करून सांगितलें, तरी तें कोण खरें मानणार! मात्र गेल्या वर्षांचा दोन दोन हजारांवरचा त्यांचा भाव, तीन-चारशें पर्यंत घसरलेला ऐकून ह्या बनावट नाण्याची किंमत लोकांना कळायला लागलेली आहे, असें मात्र वाटायला लागलें आहे.

पू. पंडित ओंकारनाथांचीं गाणीं हल्लीं बरींच झालीं. गेलीं २५ वर्षें ते संन्यस्त वृत्तीनें होते. इतकेंच नव्हे तर 'डांग' जिल्हा गुजराथला मिळाल्याशिवाय आपण तंबोऱ्याला हात लावणार नाहीं, अशी गेल्या ७–८ वर्षांपूर्वी त्यांनीं प्रतिज्ञा केल्याचीही स्मरतें. म्हणजे आपल्या संन्यस्त वृत्तीला–महाराष्ट्रीय संत गायक, पूज्य विष्णू दिगंबर पलुस्करांच्या या शिष्यानें—राजकीय स्वरूप दिलेलें होतें; आपली प्रतिज्ञा त्यांनीं पाळली असती तर बरें झालें असतें, असें आजचें त्यांचें गाणें ऐकून वाटतें! एके काळीं–अगदीं आव्हान करून–तार सप्तकांतल्या षड्जापर्यंत सहज आवाज लावणाऱ्या आणि हमखास मैफल रंगवणाऱ्या, तान पल्ल्यानीं मैफल दणाणून सोडणाऱ्या भरतीदार ओंकारनाथांचें, आजचें गाणें ऐकून प्रश्न पडतो, "हेच का ओंकारनाथ!" त्यांच्या रेकॉर्डस् अजून अस्तित्वांत आहेत म्हणून ठीक. नपेक्षां नव्या पिढीला प्रश्नच पडला असता?

### आतां कुमारांसाठीं नाटकें :

'दारू थोडी मस्ति फार' या म्हणीप्रमाणें करमणूक थोडी बडबड फार अशी कांहींशी परिस्थिति जाणत्या लोकांना भिववूं लागलेली आहे.

नाट्यकलेंतहि अशीच परिस्थिति निर्माण झालेली आहे. नाटकें थोडीं कंत्राटदार फार. थिएटरें थोडीं नाटकें फार आणि निर्माते थोडे नाटकार फार असेंहि कांहींसें झालेलें आहे.

कमी होतीं तीं मुलांचीं नाटकें. ('आनंद संगीत मंडळी' ही बालगोपाळांची एकमेव प्रतिनिधि संस्था; परंतु तिचेंहि हल्लीं नांव ऐकूं येत नाहीं.) याला अपवाद म्हणून केवळ मुलांसाठीं नाटकांची निर्मिती करायला सुविद्य व्यक्तींनीं धाडसानें आरंभ केलेला आहे.

त्यांत सुधा करमरकर यांनीं 'मतकरी' यांचें "मधुमंजिरी" आणि विजया जयवंत (आतां सौ. खोटे) यानीं पु. ल. देशपांडे यांचें "नवें गोकुळ" व तेंडुलकरांचे "अंधेर नगरींतील कटाळा दिन" हीं दोन छोटीं नाटकें गेल्या महिन्यांत सादर केलीं. पैकीं 'मधुमंजिरी' छान वाटलें. दुसरी दोन मुलांना पेललेलीं दिसलीं नाहींं; पण योग्य मेहनतीनें कदाचित् तीं अतिशय चांगलीं होतील; परंतु 'मधुमंजिरी' मात्र एकदम पसंत! स्वतः सादरकर्त्या सुधाबाई उत्कृष्ट भूमिका करतात. आणि शेवटपर्यंत उत्कंठा राहाते. दोहोंत फरक एवढाच कीं पहिलें मोठ्यांचें छोट्यांसाठीं आहे आणि दुसरीं दोन छोट्यांचीं छोट्यांसाठींच. प्रत्येक महाराष्ट्रीय रसिकानें आपापल्या मुलांना हीं नाटकें एक वेळ तरी अवश्य दाखवावीं. निर्मिती उत्तम आहे!

— गोपालन्

## देशकारण

### कायाकल्पाचें तिसरें पर्व

'राष्ट्रीय उत्पन्नांत मोठी वाढ, जलद औद्योगिकरण, रोजगारांत पुरेशा प्रमाणांत वाढ, आणि संपत्ति व मिळकत यांच्यामधील विषमतेंत घट, हीं भारताच्या तिसऱ्या योजनेचीं उद्दिष्टें राहातील. आणि राष्ट्राध्यक्ष डॉ. राजेंद्रप्रसाद यांनीं ता. ९ फेब्रुवारी रोजीं संसदेच्या अर्थसंकल्पीय अधिवेशनाचें उद्घाटन करतांना घोषणा केली. राष्ट्राध्यक्षांनीं या भाषणांत असेंहि आश्वासन दिलें कीं योजनेचा आराखडा या वर्षअखेर तयार होईल. नियोजन मंडळ तिसऱ्या योजनेचा जंगी आराखडा तयार करण्यांत गर्क असतांना दुसऱ्या योजनेंत आपण काय साधलें याचाहि आढावा राष्ट्राध्यक्षांनीं घेतला आहे. सरकारी प्रयेतुसार अशाप्रकारच्या लिखित भाषणांत उणीवांचें दिग्दर्शन नसतें आणि त्याप्रमाणें राष्ट्राध्यक्षांच्या भाषणांतहि पंचवार्षिक योजनेच्या यशाचे गोडवे गातांना अपयशाचा उल्लेखहि करण्यांत आलेला नाहीं. या संदर्भांत १९५८ च्या मे महिन्यांत प्लॅनिंग कमिशननें जो एक खलिता सादर केला तो अत्यंत महत्त्वाचा आहे. या खलित्यांत योजना मंडळानें स्पष्ट कबूली दिली आहे कीं खर्चाला ठिकठिकाणीं मोठे फाटे फुटल्यामुळें योजनेचें अर्थकारण आवाक्याबाहेर गेलें आहे. त्याला आळा घालण्यासाठीं आणि बाहेरील मदत आणि तुटीचा अर्थसंकल्प यामुळें ४८०० कोटी रुपयांऐवजीं पांच वर्षांतील एकूण खर्चाचा पसारा ४२६० कोटी रुपयाच्या आंतच आवरणें इष्ट आहे अशीहि सूचना मंडळाने दिली आहे. दुसऱ्या योजनेप्रमाणें मालाच्या घाऊक किंमती उतरतील अशी आशा होती पण १९५६ एप्रिल ते ५७ एप्रिलच्या काळांत वस्तूंच्या किंमतींत १४ टक्के वाढ झाली.

औद्योगिक हालचालीवर भर देण्यांत आल्यामुळें दुसऱ्या योजनेंत बेकारीला आळा बसेल अशी अपेक्षा होती. ७० लक्ष लोकांहून अधिक इसमांना रोजगारी मिळेल असा अंदाज होता. पण प्रत्यक्षांत पहिल्या तीन वर्षांत जेमतेम २० लक्ष रोजगार उपलब्ध झाले आणि उरलेल्या तीन वर्षांत बाकीचें लक्ष्य गाठतां येईल असा भरंवसा नाहीं.

अन्नधान्याच्या बाबतींतील स्थिति तर फार केविलवाणी आहे. पहिल्या योजनेचें सुखस्वप्न अन्नाच्या बाबतींत भारतीय जनतेला स्वावलंबी करण्याचें होतें. उलट १९५६–५७ च्या धान्योत्पादनापेक्षां १९५७–५८ मध्यें उत्पादनांत २० लक्ष टनांची घट आली. यामुळें नियोजन मंडळानें पशुसंवर्धन, जंगलें, बांधबंदिस्ती यावर खर्च होणारी रक्कम कमी करून त्यांतला बराचसा भाग अन्नोत्पादनावर खर्च करण्यांत यावा असे सुचविलें. धान्योत्पादनांत अशी घट येण्याचीं कारणें म्हणजे मोठमोठ्या

अनुक्रमणिका

धरणांच्या पाण्याचा लोकांनीं नीट उपयोग केला नाहीं. पाण्याची मुबलकता झाल्यामुळें कांहीं भागांत त्याचा वाजवीपेक्षां जास्त उपयोग होऊन जमीनीचा कस धरला तर कांहीं राज्यांत पुरेशा कालव्याच्या अभावीं धरणांतील पाणी शेतकऱ्यांपर्यंत पोंचलेंच नाहीं.

पंचवार्षिक योजनेवरील खर्चाचें कमी प्रमाण करण्याबाबत प्लॅनिंग कमिशननें ज्या सूचना केल्या त्यांत समाजकल्याण विषयक बाबींवरील खर्च कमी करावा अशी एक महत्त्वाची सूचना केली. दुसऱ्या योजनेंत ग्रामीण उद्योगधंद्याबाबतहि फारशी उल्लेखनीय प्रगति होऊं शकली नाहीं हें सत्य आहे. सामुदायिक विकास योजना आणि राष्ट्रीय विस्तार संघटना यांच्या द्वारा झालेलें कार्य रस्ते, शाळा याबाबतींतच ठळक असें झालें. पण कुटिरोद्योगाबाबत प्रगति निराशाजनक. हातमागाच्या बाबतींतील प्रगति अशीच मंद आहे. याशिवाय बेकारीचा प्रश्न आहेच !

तिसऱ्या योजनेच्या प्रवर्तकांना हे सर्व प्रश्न सोडवावयाचे आहेत. त्यामुळें झालेल्या मंद प्रगतीचें उज्ज्वल चित्र डोळ्यासमोर ठेवून लोकांची दिशाभूल न करतां नियोजन मंडळानें मागच्या अनुभवानें शहाणें होऊन देशाचा कायाकल्प साधावा असेंच सर्वसामान्य नागरिक म्हणेल.

**— भगीरथ**

## क्रीडा

### हिंदी क्रिकेटची शोककथा

आपण वादप्रेमी लोक; पण हिंदी क्रिकेटची या दशकांत पद्धतशीर पुच्छप्रगति झाली याबाबत एकमत आहे. मतभेद आहे तो रोगनिदानाबाबत. पण रोग्याची अवस्था आतां कठीण झाली आहे हें गेल्या दोन महिन्यांत स्पष्ट झालें आहे, मग निदान कांहीहि होवो. वेस्ट इंडीज् संघाविरुद्ध आपली जी वाताहात झाली तिला आपल्या आजवरच्या क्रिकेट इतिहासांत तोड नाहीं. पांचांतील तीन कसोटी सामन्यांत आपला केविल्वाणा पराजय झाला; उरलेल्या दोहोंत जेमतेम चामडी बचावली इतकेंच ! इतर सामन्यांत तर जयाची सावलीसुद्धां आपल्या जवळपास फिरकली नाहीं. मार खाण्याची संवय आतां इतकी हाडींमाशीं खिळली आहे कीं तो चुकला तर आपण कौतुक करून घेतों. धूळ चरलों तरी पुरी पाठ लागली


आमचे ' वैभवशाली ' क्रिकेट.

नाहीं म्हणून ती थोपटून घेतो. सामने जिंकण्यासाठीं आपण खेळत नाहीं. ते न हरण्यासाठी खेळतो. ती आपल्या पराक्रमाची परम आकांक्षा. त्या अन्वयें तासभर कुंथून बारापंधरा धावांची चिल्लर जमविणारा खेळाडू बहादूर गणला जातो; आणि विसापार गेला तर तो नरपुंगव ! दिवसाला दीडशें धावा करतांना आपल्या संघाला धाप लागते. अशी आपल्या क्रिकेटची प्रकृति झाली आहे !

ती कां ? वेगवान् बोलिंग खेळण्याची आपल्या खेळाडूंना संवय नाहीं हें एक लोकप्रिय कारण. तें खोटें नाहीं, पण पूर्णपणें खरेंहि नाहीं. एकंदरीनें मंदगति बोलिंगहि बेदरकारपणें खेळल्याचें फारसें दिसत नाहीं. भेदरट अंगचोरपणाला जलद-मंद सगळें सारखेंच. प्रसंगाच्या दडपणामुळें अति-सावधपणें खेळतात म्हणावें तर ज्या चेंडूच्या वाटेला जाऊं नये त्याची कळ काढून आत्मघात करण्याचा प्रकार वारंवार होतो. तेव्हां घड चढाईचा नव्हे, ठीक बचावाचाहि नव्हे असा आपला कमअस्सल खेळ.

वस्तुतः हे खेळाडू व्यक्तिशः गाजलेले; अन्यत्र ध्वजा लावलेले. मग ज्या कसोटी सामन्यांत त्यांच्या कौशल्याला तेज चढावें तेथेंच ते कां बारगळतात ? जिद्दीनें आणि खुल्या तडफेनें त्यांनी खेळावें अशी परिस्थिति नाहीं का ? ' साहेब राजी राखून ' खेळण्याच्या धडपडीमुळें खेळ बिघडतो — आणि शेवटीं, साहेबहि बिघडतो—असें होत असावें म्हणतात. या साहेबांच्या सत्तेचें राजकारण फार बुजबुजलें आहे. आपल्या राजकारणाचा खेळ ( खंडोबा ) होत आहे, आणि खेळाचें राजकारण होत आहे. तें आजचेंच नाहीं; वीस-पंचवीस वर्षें चालत आलें आहे; पण आत त्याची हद्द झाली आहे इतकेंच खेळाडूंची निवड त्यांना देण्यांत येणारी वागणूक, याबाबत गैर प्रकार घडतात. मद्रास येथें चौथा कसोटी सामना झाला, तेव्हां शेवटच्या क्षणीं नियोजित कप्तानाऐवजीं दुसरा कप्तान नेमला जाण्यांत या अरेरावीचें दर्शन घडलें. पांच सामन्यांत चार नायक झाले अशी निर्नायकी अवस्था निर्माण झाली आहे संस्थानें गेलीं पण संस्थानीवृत्ति लोपली नाहीं हे इतर कांहीं क्षेत्रांप्रमाणें क्रिकेटबाबतहि खरे आहे. हिंदी क्रिकेट हें आपलें संस्थान आहे आपली खासगी मालमत्ता आहे, असा कांहीं जणांचा उद्दाम आविर्भाव असतो. हिंदी क्रिकेटमधील या मध्यवर्ति सुल्तानीची छोटी आवृत्ति महाराष्ट्र-क्रिकेटच्या विस्कटलेल्या संसारांत दिसत आहेच !

लाखो रुपये खर्चून परदेशी क्रिकेट संघ आयात करण्याची चटक आपल्या या क्रिकेटच्या कंत्राटदारांना लागली आहे. ती कां याची चौकशी व्हायला हवी, आणि या आयातीवर निर्बंध घातला पाहिजे. आपलेच पैसे आणि आपलीच बदनामी असा आंतबट्ट्याचा व्यवहार नको. आंतरराष्ट्रीय क्रिकेट मान ताठ ठेवून आपल्याला खेळतां येईल असा आत्मविश्वास आणि तशी निकोप परिस्थिति निर्माण होईपर्यंत परक्यांकडून मानहानि नको. तोपर्यंत आपलेच मानापमानाचे खेळ एकदां निकालांत काढूं या.

**— विराम**



अनुक्रमणिका

—प्रा. न. र. फाटक
यांनी—



## घातली ही पाणपोई

दैनंदिन व्यवहारांत अनेक लहानमोठ्या शंकांचा आपल्याला सहजासहजीं उलगडा होत नाहीं; त्यांतील कांहीं प्रश्न तर अगदींच क्षुल्लक असतात तर कांहीं त्या विषयांतल्या तज्ञालाच विचारण्यासारखे असतात. 'दीपावली'च्या वाचकांच्या या शंकाकुशंकांचें समाधान करण्यासाठीं दर महिन्याला आम्ही एका विद्वानाला पाचारण करणार आहोत. मात्र वाचकांचें सहकार्य उत्तम प्रश्न पाठविण्याबाबत अवश्य पाहिजे. या सदरासाठीं वाचकांनीं आपले प्रश्न अवश्य पाठवावेत. दर महिन्याच्या सर्वोत्कृष्ट प्रश्न विचारणाऱ्या मार्मिक वाचकाला आम्ही पांच रुपयांचें पारितोषिक देणार आहोंत.

**प्रश्न १ ला**—आपण फटकळ आणि तऱ्हेवाईक आहांत असा खराखोटा लौकिक आहे. यावर आपलें काय मत आहे ?

**उत्तर**—कांहीं मर्यादेनंतर एखाद्याशीं बोलतानां जें आपल्या मताप्रमाणें योग्य वाटेल तें आडपडदा न ठेवतां स्पष्ट असंदिग्ध शब्दांत व तें ऐकल्यानें भागत नाहींसें दिसल्यास खडतर भाषेंत सांगून टाकणें याला जर फटकळ समजायचें असेल तर वरील प्रश्नांतील पहिला आरोप खरा ठरेल. बऱ्याच कालावधीनंतर एखादी व्यक्ति भेटायला आली असतां, भेटीचा हेतू एकदम बोलून टाका, असें त्या व्यक्तीला म्हटलें व त्याचे या म्हणण्याविरुद्ध व्यक्त होणारे आढेवेढे, गरजेशिवाय भेटीला आलेलों नाहीं अशी पहिल्या वाक्याला पुस्ती जोडून उडविले तर या प्रकाराला फटकळपणा मानणारीं पुष्कळ लब्धप्रतिष्ठित माणसें आढळतात, आणि असल्याच व्यक्तींनीं फटकळपणाचा लौकिक पसरविलेला आहे. बऱ्याच कालावधीनंतर भेटणाऱ्या व्यक्तींचा–प्रसंग उदाहरणादाखल दिलेला आहे. असे प्रसंग चाणाक्ष व अनुभवी वाचक वाढवूं शकतील. अज्ञानापायीं रूढ असलेल्या समजुतींनां धक्का देणारीं मतें प्रकट करणाऱ्यावरूनहि सामान्यतः तऱ्हेवाईक अथवा विक्षिप्त या शब्दांचा प्रयोग चालतो. त्या प्रयोगाचें मूळ अज्ञानच होय.

**प्रश्न २**—आपल्याला व्यसन कोणतें ? यांत आपला किती पैसा आणि वेळ खर्च झाला ?

**उत्तर**—पान-तंबाखू खाण्याच्या संवयीला व्यसन म्हणतां येईल, पण खरें व्यसन ग्रंथसंग्रहाचें आणि लेखन साहित्याचें. लेखन साहित्य म्हणजे झरण्या, नानाप्रकारच्या पेन्सिली, कागद, दौती, टाक, बोरू, निबें, शाया वगैरे. एखाद्या विषयाचा अभ्यास करतानां त्याला अवश्य तीं महत्वाचीं सर्व पुस्तकें आपापल्या मालकीचीं असावीं, दुर्मीळ असतील तर शोधून, जास्त किंमत देऊन हस्तगत करावीं, या व्यसनानें ज्ञानार्जनासाठीं सुमारें पन्नास वर्षांमधें हजारों रुपये खर्च झाले असतील; (त्याचा हिशेब कधींच ठेवलेला नाहीं.) लेखन साहित्याचें व्यसन अशा अवाढव्य खर्चाचें नाहीं.

किती वेळ खर्च झाला हा प्रश्न व्यर्थ आहे. विद्यार्जनाचा काळ, नंतर वृत्तपत्राचें काम, त्यामागून विद्यार्थ्यांनां शिकविण्येचें काम, ग्रंथांचें व सामान्य स्फुटलेखन, यासाठीं ग्रंथवाचन निरंतर करावें लागत होतें व तोच क्रम डोळे व डोकें धड असेपर्यंत चालू राहील. ग्रंथांची संगत तोडणारी सार्वजनिक सेवा करण्याचा योग आला नाहीं.

**प्रश्न ३**—भूत पिशाच्चावर विश्वास आहे का ?

**उ०**—सामान्यपणें विश्वास नाहीं. ज्या अनुभवाचा विलक्षणपणा किंवा विचित्रपणा तर्काला किंवा उपलब्ध शास्त्राच्या ज्ञानाला त्याच्या मागें कांहीं तरी भुताचा खेळ असावा असें मानणारांपैकीं मी नाहीं. पण आयुष्यांतले दोन अनुभव, भूत हें नांव ज्या प्रकारास दिलें जातें त्या प्रकारांपैकीं वाटतात. अनुभव प्रौढवयांतील आणि प्रवासाची वाटचाल सुरू असतां (पूर्णपणें जाग्रत व सावध असतां) पहाटेच्या वेळीं आला असून त्या प्रसंगीं दिसलेल्या मनुष्याकृतीची व तिच्या हालचालींची उपपत्ति अद्यापी लागलेली नाहीं. एकदां तो प्रसंग कोंकणांत भूतपिशाच्चाविषयीं विश्वास मोठ्या प्रमाणांत आढळतो. त्या प्रदेशाच्या कांहीं भागांत १९३१ सालीं जल-प्रलयाची पहाणी करण्यासाठीं फिरावें लागलें. या संचाराला काळवेळाचें बंधन नव्हतें. रात्रीं बेरात्रीं देखील रानें-डोंगर वगैरे स्थळें तुडवीत असतां तेथील माहितीचे सोबती भुतांच्या गोष्टी सांगत असत. (भुतांच्या अस्तित्वाचें समर्थन करणारे वाङ्मय पुष्कळ वाचलें आहे) पण भुताचा अनुभव केव्हांच आला नाहीं. गाणगापूर, औदुंबर, नरसोबाचीवाडी या तीर्थांवर विशिष्ट तिथीला किंवा विशिष्ट वारीं—तीर्थांवर एकत्र असतील तर हमखास—भुतांचा प्रत्यय येतो असें ऐकण्यांत आल्यामुळें तसे दिवस पंचांगांत पाहून तेथें गेलों परंतु भूतचेष्टा प्रत्ययास आल्या नाहींत; यामुळेंच 'सामान्यतः विश्वास नाहीं' असें वाक्य प्रारंभीं लिहिलें आहे.

स्मशानामध्यें नग्नावस्थेंत रहाणाऱ्या साधू पुरुषाची भेट एकदां झाली. हा साधू अस्खलीत इंग्रजी बोलणारा व चांगल्या विद्वानांत गणला जाऊं शकेल असा होता. त्याला भूतांबद्दल प्रश्न विचारला तेव्हां त्यानें 'भुतें वायुरूप असतात. साध्या दृष्टीला तीं उमगत नाहींत परंतु योगसिद्धीच्या दृष्टीला तीं गोचर होतात; तीं स्वयमेव कुणाच्या वाटेला जात नाहींत,' वगैरे आशयाचें उत्तर देऊन जास्त खुलासा केला कीं भुतांची योनी ही शिक्षेची योनी आहे. कैदी रस्त्यावर काम करीत असतां रहदारीच्या वाटेस जात नाहीं तशीच भुतांची वागणूक असते. कैद्याला कोणी छेडल्यास तो ज्याप्रमाणें प्रतिकार करील त्याचप्रमाणें भुतेही प्रतिकार करतात. पण ज्याच्याकडून भूत दुखविलें जातें त्याला मात्र आपला प्रमाद कळत नाहीं. भुतें माणसांच्या वस्तीपासून दूर रहातात...

साधूच्या संवादांतला थोडासा विचारकरण्याजोगा अंश भूतश्रद्धेच्या लोकांसाठीं येथें सादर केला आहे. ज्यांची श्रद्धा असेल त्यांच्याशीं मी वाद घालीत नाहीं, कारण ही श्रद्धा जागतीक स्वरूपाची आहे. युरोपांत Ghost आणि Spirit असा भेद आढळतो.' मृतांच्या आत्म्यानां बोलावून त्यांचें मनोगत जाणण्याचा व्यवसाय चालतो हें पुष्कळांस माहीत असेल. ह्या व्यवसायाचें इतिहास संशोधनाला मात्र कधींच साह्य झालेलें नाहीं; उलट कित्येकदां अशा तथोक्त मृतांच्या आत्म्यानीं कुटुंबस्वास्थ्यांत विष कालवल्याचीं उदाहरणें सांपडतील. ●●

Statement about ownership and other particulars about newspaper

**DIPAVALI MONTHLY.**

(Form IV Rule 8.)

1. Place of Publication.
   Dalal art Studio,
   40-42, Kennedy Bridge.
   Bombay-4.
2. Periodicity
   Monthly, published on
   1st of every month.
3. Printer's Name
   Dinanath Damodar Dalal
   Nationality
   Indian.
   Address
   40-42. Kennedy Bridge,
   Bombay-4.
4. Publisher's Name, Nationality, Address } As per 3 above
5. Editor's Name, Nationality, Address } As per 3 above
6. Names and addresses of individuals who own the newspaper and partners or Shareholders holding more than one per cent of the total capital.
   Dinanath Damodar Dalal
   Proprietor.
   Address as per 3 above.
   No Partners or shareholders.

I, Dinanath Damodar Dalal, hereby declare that the particulars given above are true to the best of my knowledge and belief.

Dated 15th February 1959

D. D. Dalal

Signature of publisher.



# आम्हीं तुमच्या पाठीशीं आहोंत

प्रिय मित्र श्री. दलाल,

तुम्ही मला मानतां. हें मला माहीत आहे. 'दीपावली' वर तुमच्याइतकाच माझा जीव आहे. 'दीपावली' शिवाय तुमचा माझा परिचय झाला नसता. आतां 'दीपावली' पेक्षां ही तुमच्यावर माझा जीव आहे. अंगीकृत कार्यांत मी तुम्हांला यश इच्छितो. तुमचें यश तेंच आमचें यश. मी तुमच्या शेजारीं उभा आहे. कसूर करणार नाहीं. कसोशी करीन. आणखी काय लिहूं ! हे आशीर्वाद.

आपला

**स. आ. जोगळेकर.**

३ २-५९ ॥ श्री ॥ डोंबिवली

मित्रवर्य दलाल,

'दीपावली' मासिकांत मी दरमहा निदान एक तरी दिवा लावीन. (कदाचित् अधिकहि लावीन) असें वचन देतों. गेलीं चवदा वर्षें हें 'दिवे लावण्याचें' काम मी आपणाकडे नियमितपणें करीत आलों आहे. हाच क्रम अखंड पुढें चालू राहील हें सांगावयास नको. कारण जेथें तुम्ही तेथें आम्ही ! गेले वर्षभर जें बोलत आलों, तें प्रत्यक्ष घडत आहे, त्याचा आनंद फार वाटतो. 'दीपावली'च्या, दर्जाविषयीं व यशाविषयीं तुमचे सर्व वाचक व मीहि निःशंक आहे !

स्नेहांकित,

**पु. भा. भावे.**

प्रिय दलाल,

'दीपावली' मासिक-स्वरूपांत प्रसिद्ध होणार हें ऐकून अत्यानंद झाला. वार्षिकाच्या निमित्तानें महाराष्ट्रांतील मान्यवर साहित्यिकांचें प्रेम तुम्ही मिळवलें आहे. ते सर्वजण तुमच्या कार्यांत सहभागी होतील. रामकथेंतील खारीसारखी, माझी एवढीशी प्रतिभा तुमच्या या सेतुबंधनांत सहकारिणी होईल.

आणखी काय लिहूं ! 'दीपावली' ला सदैव सुयश लाभो. तुमचा,

**ग. दि. माडगूळकर**

॥ श्री ॥ कोल्हापूर, [illegible]

सप्रेम न. वि. वि.

तुमचें पत्र पोचलें. "दीपावली" मासिक होत आहे हे वाचून आनंद वाटला. तुमच्या 'वार्षिक'चा दर्जा लक्षांत घेतां असें मासिक चालविणें अवघड आहे हे खरें. पण साहित्य क्षेत्रांतलें तुमचें मोठें मित्रमंडळ, तुमची कलादृष्टी आणि तुमच्या हजारो हितचिंतकांच्या सदिच्छा यांच्या बळावर तुम्ही या कामीं पूर्णपणें यशस्वी व्हाल असा मला विश्वास वाटतो. अधूनमधून दीपावलीसाठीं काहींतरी बरें लिखाण पाठवीन.

तुमचा,

**वि. स. खांडेकर**

प्रिय दलाल,

दिवाळी अंकांचा बादशहा आतां दर महिन्याला वाचकांच्या भेटीला येणार तर ! चौदा वर्षांपूर्वी 'दीपावली' चा जन्म झाला आणि आपल्या स्नेहाला त्याहून अधिक वर्षें लोटलीं आहेत. अशा परिस्थितींत 'दीपावली' मासिक हें माझेंच मासिक आहे असें मी मानतो. आपण कसलीहि काळजी न करतां पुढचें पाऊल टाकावें. आम्ही आपल्या मागें सदैव आहोंत.

मराठी नियतकालिकांत 'दीपावली' आपल्या कुशल संपादनामुळें एक नवा आदर्श निर्माण करील याची मला खात्री आहे. अधिक काय लिहूं !

तुमचा,

**बाळ सामन्त**


हें मासिक श्री. दीनानाथ दलाल यांनीं जगदीश्वर प्रिंटिंग प्रेस, गायवाडी, मुंबई नं. ४ आणि कांहीं भाग न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०/४२, केनेडी ब्रिज येथें प्रकाशित केलें.



अनुक्रमणिका

RGD. NO. B-7640





अनुक्रमणिका